# दीपकळी

सौ. कुसुमावती देशपांडे

[ आवृत्ति पहिली ]

१९३५

मुद्रक:—
कृष्णाजी नारायण सापळे,
रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस,
१५-१७ त्रिभुवनरोड, मुंबई ४.


मलपृष्ठावरील तीन रंगी चित्र लेखिकेनें अबदुल रहिमान चुगताई यां
एका चित्रावरून कल्पना घेऊन काढलेलें आहे.



प्रकाशक:—
प्र. श्री. कोल्हटकर, ब.

त्याच्या पाठोपाठ, एका बाजूनें, त्याची ' सहधर्मचारिणी ' चालत होती. नवऱ्याच्या त्या अस्वाभाविक गतीबरोबर ती अत्यंत हळूंहळूं एकेक पाऊल टाकी व पालुपदाची वेळ येतांच अगदीं सहज म्हणे, " भजले रामलीला...... ! " पण तिच्या म्हणण्यांत उत्कंठा नव्हती. नवऱ्यासारखा पराकाष्ठेचा प्रयत्न नव्हता. कुठें तरी पहात ती तेवढा चरण म्हणून टाकी. हळूंहळूं भोंवताली जमूं लागलेल्या लोकांकडे तिचें लक्ष नव्हतें. तिच्या मनांत काय विचार चालले असतील कोण जाणे, पण तिला एकंदरींतच जगांतल्या सर्व प्रकारांबद्दल मौज वाटत असावी. इतकी नाडलेली स्त्री- अंगावर अत्यंत मळकट लक्तरें, पाठीवर झोळी, पोटाशीं तान्हें मूल ! तिच्या तोंडावर किंचित् तरळतें हंसूं पाहून माझा माझ्याच डोळ्यावर विश्वास बसेना. पण खरोखरीच ती हंसतमुख होती. मात्र तें हास्य आनंदाचें नव्हतें. तें तिरस्कारानें, उपरोधानें ओथंबलें होतें. मधूनच तिची चर्या पालटे. दूरवर, कुठें तरी खिळलेली आपली उपहासात्मक दृष्टी ती मधेंच खालीं वळवी व आपल्या हातांतल्या, पोटाशीं धरलेल्या तान्ह्या मुलावर तिची नजर खिळतांच तिचा चेहरा गंभीर, वात्सल्यपूर्ण होई. हलक्या हातानें ती त्याच्या डोक्याभोंवतालचें रकटें मागें सारी व अशा- वेळीं ती तेंच पालुपद अत्यंत नाजुकपणें, मनोभावानें म्हणे.

मी कांहीं वेळ तरी जागच्या जागींच खिळल्यासारखी झालें. पुस्तक कुठल्याकुठें गेलें. सरळ ताठ उठून बसून अनिमिषपणें त्या खुरडत येणाऱ्या कुटुंबाकडे मी पहात राहिलें आणि मग एकदम काय झालें कुणास ठाऊक ! आंधळ्याखेरीज कुणालाही एक पैसा न देणारी मी, त्या माणसानें न माग- तांही, त्याच्या अंगावर एक जुना पण चांगला कपडा फेंकीत आहे, असें मला आढळून आलें.

त्याला अर्थातच पराकाष्ठेचा आनंद झाला. त्यानें चट्‌दिशीं आपलें गाणें थांबवलें व तो भराभर लाखों आशिर्वाद देऊं लागला. " भगवान् तेरा भला करे माजी—भगवान् तेरा भला करे...... " म्हणतच तो पुढें सरकूं लागला. त्याचें चऱ्हाट सुरूं झालें तें झालेंच. " बोहनी " होईपर्यंतच गायचें असा

त्याचा बेत होता कीं काय कोण जाणें ! त्यानें चौरस्ता गांठला आणि तिथें व्याख्यानच सुरू केलें. " देखिये भाई—वो माजीनें कपडा दिया......कुछ तो भी धरम करना भाई...लंगडे लुलेको धरम करना...दया धरमको परमेसर सुखी रख्येगा मालक..." त्याचा वाक्प्रवाह अस्खलितपणें वहात होता. त्याचा आवाज पलीकडल्या चौरस्त्यावर पोंचेल इतका खणखणीत होता... " परमेसर सुखी रख्येगा मालक " मधेंच तो एक आरोळी ठोकी— " तनकि आग बुजवाय......" पण पालुपदाची वेळ यायच्या आधींच पुनः त्याचें शब्दजंजाळ सुरू होई.

मला त्याच्या शद्बांचा वीट आला. ती अत्यंत पढीकपणाची बडबड होती. फेरीवाले नाहीं कां ओरडत " एकेक चीज दो दो पैसा...! " पण त्या बाईवर अजूनही माझी दृष्टी खिळली होती. नवऱ्याचें वाक्पांडित्य सुरू झाल्यावर, तिला विचाराला अवकाश मिळाला म्हणून की काय-तिच्या चेहेऱ्यावरील उपरोधाची छटा जास्तच तीव्र झाली. कुणी फेकलेला पैसा नवऱ्यानें उचलला कीं त्याच्या हातून ती तो घेई. पण तेंहीं समोर कुठें तरी पहात. तिच्या वृत्तीचें मला फारच कुतूहल वाटूं लागलें.

*　　　*　　　*

त्यानंतर चारपांच दिवसांचीच गोष्ट. संध्याकाळीं मी एकटीच फिरायला निघालें. हिंवाळ्याच्या शेवटले गळलेल्या पानांशीं शिवाशिवी खेळणारे वारे सुरू झाले होते. पश्चिमेचें सबंध क्षितिज सूर्याच्या उदार हृदयानें रंगलें होतें. माझें मन प्रसन्नतेनें भरून गेलें. भरास आलेल्या शेतावरून तरळणाऱ्या सोनेरी किरणांच्या लाटा पहात पहात मी बरीच दूर गेलें.

त्या बाजूला एक लहानशी वस्ती होती. बहुतेक घरें झोंपडीवजाच होतीं. कुठें मधून एकादें अंगण नीट सारवून त्याला पांढऱ्या मातीनें किनार काढलेली दिसे. कुठें झोंपडीच्या कडेनेंच वाहून वाहून किटलेली मोरी दिसे. मी वस्तीच्या जरा दुरूनच जाणाऱ्या पायवाटेनें पुढें चाललें.

वस्तीच्या दुसऱ्या टोंकाला, एक अगदीं लहानशी झोंपडी होती. बाहेर

एका खाटेवर एक तान्हें मूल पडलें होतें. आणि पलीकडे राख व निखाऱ्यांच्या ढिगांत भाकर भाजीत एक बाई पाठमोरी बसली होती. जवळपास पाऊल वाजलें म्हणून तिनें सहज वळून पाहिलें. ती तीच भिकारीण होती.

माझ्या पायांनीं मला नकळतच पुढें नेले; पण माझ्या मनांत मात्र तिची स्थिती जाणून घेण्याबद्दल फारच उत्सुकता उत्पन्न झाली होती. प्रसन्नतेच्या उत्साहांत थोडेंसें संशोधन करण्याची स्फूर्ति झाली. मी परत फिरलें व हळूंहळूं त्या बाईपाशीं आलें. गति पूर्णपणें न थांबवतां, अगदीं शक्य तितकें सहज विचारल्यासारखें करून मी तिला म्हटलें, " कोणची वस्ती आहे ही ? " तिनेंही सरळ उत्तर दिलें व म्हणाली, " फिरायला चालल्लां ? "

आमच्या संभाषणाला चांगलीच सुरवात झाली. तिच्या मुलाबद्दल मी विचारलें तेव्हां तर तिची वाचा बरीच खुलली. तो नेहमीं आजारी असे. ताप येई. सारखा खोकला—हातापायाच्या नुसत्या काड्या झाल्या होत्या. " कसं करणार ? दिवसभर उन्हांत रखडावं लागतं त्याला..." ती सहज बोलून गेली. मला अनायासें किल्ली सांपडली व मी चटकन् म्हटलें, " कां ? तूं मजूरी करतेस ? " तिनें उत्तर द्यायचें जरा टाळलें व मग कांहींसें विचारांत म्हटले " होऽऽ "

तिची ती दूरवर खिळणारी दृष्टी परत आली होती. पण ती दृष्टी आज शून्य नव्हती. ती आपल्या जिवाशीं कसला तरी धडा करीत होती. पहातां पहातां ती म्हणाली, " मजुरीच नाहींतर काय ती ! बाई, मी तुम्हांला ओळखलं. त्या दिवशीं तुम्हांला कळवळा आला आणि तुम्ही चट्दिशीं आमच्या अंगावर सदरा टाकला. माझ्या नवऱ्याला आनंद झाला पण मला अगदीं शरमल्यासारखं झालं..."

माझ्या दातृत्वाबद्दल ती बोलूं लागली म्हणून कीं काय मी विषय टाळूं लागलें. " पण तुझा नवरा कुठें आहे ? "

" बाजारांत गेले—जमलेल्या वस्तु विकायला. "

" पण इतक्या लांब ? "

" तेंच तर सांगते मी. " तिनें एकवार मागें वळून पाहिलें. दूर त्या पायवाटेच्या टोंकावर एका चालत येणाऱ्या माणसाची आकृति दिसत होती. ती दिसतांच तिचा निश्चय झाला असें दिसलें. ती म्हणाली, " ते पहा, तुम्हांला नवल वाटेल, पण...माझा नवरा लंगडा नाहीं. " ती थोडा वेळ थांबली व पुनः माझ्या प्रश्नार्थक चेहेऱ्याकडे पाहून म्हणाली, " आम्ही आळशी नाहीं. बाई, दोघंही गिरणींत काम करीत होतों. पण संप झाला. पुढें गिरणीमालकांनीं गिरणी बंदच केली. त्यांनीं खोटाच तोटा दाखवला म्हणे. पण आमचा खोटेपणा तेवढा दिसून पडतो. जवळची पुंजी संपली तरी दुसरं काम मिळेना. प्रत्येकजण विचारी, " आधीं कुठें होतास कामाला?" तुम्हां लोकांत ओळखीशिवाय कोण ठेवणार? कुणी कुणी तर माझ्या नवऱ्याच्या हाताकडे पहात. गिरणींत काम करतांना एकदां त्यांचा सबंध हात भाजला होता. अजून तो लाल दिसतो. त्यांना वाटे कोडच असावें तें, आणि म्हणत, " नकोरे बाबा, आमच्याकडे कामच नाहीं. " अखेर भिक्षेची वेळ आली. आणि आजकाल धडधाकट माणसाला कोण भिक्षा देतो, मायबाई? म्हणून ही लंगड्याची माया केली!...माझ्या दोन रुपयांच्या कमाईवर काय होणार..." तिचा गळा दाटून आला, डोळे भरत आले. ती घाबरल्यासारखें बोलूं लागली. व एकदम माझ्या पायावर हात ठेवून म्हणाली, " खोटेपणा करूं नये तर जगावं कसं? राग नका मानूं बाई...कुणापाशीं बोलूं नका...माझ्या पोराची शपथ आहे तुम्हांला...अजून फावल्या वेळांत माझा नवरा काम शोधीत असतो..."

" नाहीं ग नाहीं " मी चट्दिशीं तिला म्हटलें; " मी नाहीं बोलत कुणापाशीं. तो बघ तुझा नवरा आला. "

नोव्हेंबर १९३४.

---

# एकटीच....

आमच्या गंगाकाकूंचं इतकं वय झालं होतं, तरी त्यांचा उत्साह मात्र कमालीचा ! त्यामुळें, चार दिवसांसाठीं जरी त्या पाहुण्या आल्या तरी घरांत एक वेगळीच प्रसन्नता भरून राही. गप्पासप्पांना कोण रंग चढे ! त्यांच्या त्या उत्साही स्वभावामुळें आम्हां दोघांना त्यांच्या व आमच्या-मधील एका संबंध पिढीचं अंतर कधींच जाणवलं नाहीं. कुठलाही अगदीं अलीकडील विषय जरी निघाला तरी त्याबद्दल त्यांना कुतूहल वाटे, आणि एरव्हींपेक्षां जास्त चिकित्सापूर्वक वाद होई. आपला जवळ, जवळ पन्नास वर्षांचा अनुभव हा काकूंच्या चर्चेचा मुख्य आधार असल्यामुळें आमच्या वादविवादांत एकप्रकारचा जिव्हाळा निर्माण होई, आणि कधीं कधीं तर, विषयाकडे पाहण्याची एक नवीनच दृष्टि मिळाली, असें आम्हांला वाटे.

त्या दिवशीं संध्याकाळीं आम्ही दोघीच मागच्या अंगणांत होतों. काकू कांहीं तरी विणीत होत्या आणि मी उमलूं आलेल्या जाईच्या कळ्या तोडीत होत्यें. कांहीं कळ्या एव्हांना उमलून त्यांचा नाजुक सुवास चौकांत दर-वळला होता. त्या नाजुकपणानेंच माझ्या मनाला कसंसं वाटलं कीं काय कोण जाणे,–मी एकदम म्हटलं, " आज किती उशीर झाला आहे कचेरी-तून यायला–"

काकू हंसल्या व म्हणाल्या, "कशा ग तुम्ही मुली? इतक्या शिकलां-सवरलां स्वतः मिळवत्या झालां, तरी तुमचं समाधान आपलं दुसऱ्या कुणावर तरी अवलंबून, नाहीं?"

"ते कसं बदलणार, काकू!" मी म्हटलं. पण त्यांचं लक्ष नव्हतं. त्या कुठल्या तरी विचारांत मग्न झालेल्या दिसल्या. थोड्या वेळानें त्या म्हणाल्या, "काल सकाळचा आपला वाद आठवतो ना तुला, लिलू—बायका प्रेमळ आहेत कीं आपमतलबी याबद्दलचा?"

"हो, आठवेल नाहीं तर काय, काकू! चांगलीच खडाजंगी झाली कीं, विनूची आणि आपली. पण तुम्ही बरंच मनावर घेतलेलं दिसतं विनूचं वाक्पांडित्य. त्याचं नेहमींचंच आहे हें, काकू. पण त्यांत कांहीं विशेष अर्थ नसतो कधींच. माझ्याशीं तर नेहमींच अशी हुज्जत चालते. त्याचा एक आपला करमणुकीचा विषय आहे 'स्त्रियांचं मन' म्हणजे..."

"तें मला चांगलं कळतं ग..." काकू म्हणाल्या. पण त्यांचा आवाज आज मला विशेषच गंभीर वाटला. त्यांच्या मनांत कांहींतरी वेगळीच खळबळ चालली असावी, असें त्यांच्या चेहऱ्यावरून स्पष्ट दिसत होतें. त्या हातांतलें झरझर विणीत होत्या, पण ती गती जणूं त्यांच्या विचारांच्या प्रवाहाचीच सूचक होती. मी कांहींशा आश्चर्यानेंच त्यांच्याकडे पाहूं लागल्यें.

त्या कांहीं वेळानंतर पुढें म्हणाल्या, "लिलू, तुझ्या व विनायकाच्या एकमेकांविषयींच्या जिव्हाळ्याची मला जाणीव का नाहीं? तुमचे थट्टेंत चाललेले वादविवाद म्हणजे तर माझी म्हातारपणची करमणूक होऊन बसली आहे. दुसरीकडे कुठंही जीव वैतागला कीं मला आपलं तुमच्या या घरकुलांत येऊन सारं विसरून जावंसं वाटतं. पण कालच्या वादाच्या भरांत माझ्याच हातानं कांहीं जुन्या जुन्या जखमा इतक्या तीव्रतेनीं दुखावल्या गेल्या कीं, त्यांचा अजून पुन्हां विसर पडत नाहीं. माझ्या अनुभवाच्या ह्या भागाचा तुला कधींच उपयोग होणार नाहीं, नच होवो. पण......"

काकू थांबल्या. पण त्या कांहीतरी [illegible] बोलणार हें मला स्पष्टपणें कळलं. मी हळूच त्यांच्याजवळ जाऊन बसलें. त्या पुढें बोलूं लागल्या.

“ लीले, स्वभावधर्माप्रमाणें स्त्री ही मुख्यतः पत्नी आहे कीं, माता आहे, हा वाद पुरुषांना घालूं दे वाटेल तितका. पण खरं जर पाहशील किनई, तर स्त्री ही अगदीं एकटी आहे. आजपर्यंत तरी ती एकटीच आल्या परिस्थितीशीं मूकपणें झगडत आली आहे. आतां कुठें कुठें थोडा बदल दिसतो. सहानुभूतीचा ओलावा दिसतो; जाणीव, समज आढळून येते,......पण तें किती ? तिकडे पाहून कोणीही मनांत नसती आशा उत्पन्न न होऊं दिलेलीच बरी......माझंच पहा ना......लग्नांत मी तेरा चवदा वर्षांची होत्यें....”

काकूंचा आवाज उदास होता, पण त्यांची दृष्टि पूर्वीच्या त्या उमलत्या सुखाच्या काळांत रमली होती. मी त्यांच्याकडे अनिमिषपणें पहात आहे हें लक्षांत येतांच त्या पुढे बोलूं लागल्या, “ लग्नाचा दिवस जवळ येऊं लागला कीं, आतां देखील तुझ्यासारख्या मुलींची काय गडबड उडते तें मी पाहिलं आहे. पण माझ्या वेळच्या माझ्या वयाच्या मुलींची स्थिती खरंच शब्दापलीकडे असे. उत्सुकता, सुखाच्या कल्पनांचे डोलारे तर प्रत्येकीच्याच मनांत उभे रहात. दारीं येणारा प्राणी हा आपल्या भाग्याचा मेरू, सद्‌गुणांचें आगर—त्याच्या भेटीनंतर आपण स्वर्गसुखांत पोहणार, अशी प्रत्येकीची कल्पना. गौरीहराजवळची परंपरेची ही शिकवण किती उत्कटतेनें त्या मानून घेत, याची कल्पना केली तर कधीं कधीं हंसू येतं...बरोबरच्या मुली चिडवीत, “ आतां काय बाई, हक्काचं माणूस मिळणार, मग कशाला कुणाची फिकीर ? ” हंः ! कांहीं अर्थ त्या थट्टेत !......किती लवकर सगळं कळून चुकतं ! ”

“ इतकी वर्षं झालीं, तरी माझ्या मनाच्या अवस्था मला किती स्पष्टपणें आठवतात. आमच्या घरी वडीलधारं कुणीच नव्हतं. लग्नाच्या आधीं कितीतरी वर्षं नोकरीनिमित्त एकटंच रहायला लागलं होतं त्यांना. खाणावळीच्या अन्नाला अन् एकटं एकटं रहायला अगदीं कंटाळले आहेत, असं माझ्या नेहमीं कानावर येई. म्हणून कीं काय, कोण जाणे—माझ्या आटपशीर, नीट-

नेटक्या अन् मनमोकळ्या संसाराची फारच मनोरम चित्रं माझ्या डोळ्यांपुढें उभीं रहात. अन् ते पहिले दिवस गेले तरी किती सोन्यासारखे? त्यांच्या सुखासाठीं काय काय करावं, हाच एक मला निदिध्यास लागला होता. रात्र होते न होते तों दुसऱ्या दिवशींच्या तोंड धुण्याच्या तयारीपासून तर भाजी आमटीच्या व संध्याकाळच्या फराळाच्या बेतापर्यंत माझं सारं योजून तयार असे. त्यांना देखील, मी केलेल्या सर्व गोष्टींचं कौतुक वाटे. घरांत कोणा बाईचा हात फिरल्याबरोबर प्रत्येकच वस्तु कशी जागच्याजागीं, साधी असली तरी शोभिवंत दिसूं लागते. सगळ्या घराला आपोआपच एक वेगळी कळा येते. असा फरक तर त्यांच्या एकाकी, रूक्ष जीवनानंतर त्यांना फारच जाणवायचा.—कधीमधीं उल्हासपूर्ण विचारांतून सवड मिळालीच तर मला माझ्या ओळखीच्या कांहीं बायकांच्या संसाराविषयींच्या औदासिन्याची आठवण येई. त्यांच्या नवऱ्यांच्या स्वभावाशीं यांच्या वृत्तीची मी तुलना करूं लागे, व स्वतःला त्रिवार धन्य समजें. मला वाटे, मला खरंच कायमचं निवाऱ्याचं स्थान मिळालं.—अगदीं लहानपणीं माझा दादावर कित्ती जीव होता, त्याचा शब्दन् शब्द झेलायला मी तयार असे. बुद्धिमत्तेबद्दल, ज्ञानाबद्दल मला कोण कौतुक!...पण या सर्वाबरोबरच, त्यानें आपल्याकडे थोडें तरी लक्ष द्यावं. कांही गोष्टी सांगाव्या, शिकवावं,' असं देखील वाटे. पण दादासाहेब कसले! सदा आपल्या पुस्तकांत किंवा मित्रमंडळींत गर्क. लहान बहीण म्हणजे त्याच्या दृष्टीनें कोणा झाडाचा पाचोळा. प्यायला पाणी लागलं, नाहींतर असंच कांही काम असलं कीं, गंगीची आठवण व्हायची. त्याच्या वागणुकीमुळं माझं बालमन फारच खट्टू होई. माझं कुतूहल, माझा खेळकरपणा, लडिवाळपणा सगळा मरून गेला. यांच्या कौतुकामुळें त्या साऱ्यांचं पुनरुज्जीवन झालं. मला नवीन गोष्टी सांगण्यांत त्यांनाही धन्यता वाटे. त्यावेळीं अतिशय लोकप्रिय झालेल्या हरीभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्यांची गोडी त्यांनीं मला लावली. कधीं कधी त्यांच्या सांगण्यामुळें जुन्या गोष्टींत देखील किती नवलाई आढळून येई. श्रीधरांच्या रामविजयाचा रसाळपणा मला त्यामुळेंच कळला.

" पण आतां वाटतं, हें सारं नसतं झालं तरी बरं झालं असतं. त्यामुळें मला पुढला एकटेपणा फारच भकास वाटला...आतांशा बरेच कादंबरीकार बायकांच्या दुःखांबद्दल लिहितात. अनुभवाच्या अभावीं, त्यांना त्यांच्या दुःखाचं कारण नवऱ्याच्या व्यसनांत शोधावं लागतं. तसंच असतं तर आज निदान शेंकडा पन्नास तरी बायका सुखांत असत्या ना ? इतक्या थराला गोष्टी कशाला जायला हव्या...दोन तीन महिने खेळीमेळीचे गेले, पण पुढें तितकीच बेफिकरी आली बघ त्यांच्यात. आपण इकडे फराळाची सर्व तयारी करून मनोभावानें वाट पहात बसावं, तर त्यांनीं परस्परच कुठेंतरी मित्राकडे जावं, अन् रात्रीपर्यंत येऊंच नये. आलंच तर बाहेरूनच सांगावं, " त्या अमुक अमुक पंतांबरोबर ऑफिसांतच चहा घेतला मी...मला कांहीं नको बरं का. " जणूं काय, खायचं प्यायचं असेल तरच बायकोचं तोंड पहावं, नाहींतर मग दिवसभर ती कुठंही कां मरेना ? अन् ह्या अशा अवस्थेंत बायकाही दिवसाचा वेळ घालवायला कुठें तरी चकाट्या पिटीत बसतील नाहीं तर काय करतील—

" आमच्या सदाशिवाच्या जन्मानंतर स्वारी पुन्हां कांहीं दिवस खुशींत आली होती. पण ती देखील चार दिवसांची नवीनवलाई म्हणूनच. अगोदर मुळीं माझ्या माहेरपणांत, दिवसभराची एक वेगळी रहाटी पडलीच होती, त्यांत पुढें बरं कारणही सांपडलं. नेहमीं मला म्हणावं, " चला, आतां तुझ्या करमणुकीची भुणभुण माझ्यामागें उरली नाहीं. आजकाल नव्या माणसाच्या इतकी तैनातींत आहेस कीं मी दोन दोन दिवस आतां घरीं आलों नाहीं, तरी तुला कांहीं वाटणार नाहीं. " इतकंच काय, असंहि म्हणावं कीं, " बायकांचा जीव सारा मुलांबाळांत त्यांच्यापुढें त्यांना नवऱ्याची देखील पर्वा नाहीं ! "

" किती उत्तम सोडवणुकीचा मार्ग, नाहीं हा ? बायकांच्या भांड्याकुंड्यांच्या हौशीची, मुलाबाळांच्या जोपासनेंत अवश्यमेव जाणाऱ्या त्यांच्या वेळाची वरवर थट्टा करावी. पण मनांत भाव हा, कीं बरी पीडा टळली, त्यांच्या मनाचा आतां आपल्याला विचार करायला नको. कोणत्याही कारणा-

मुळें म्हणा, आपल्यापेक्षां कमी विकास पावलेल्या बुद्धीच्या प्राण्याला बरोबर घेऊन चालायचं म्हणजे गळ्यांत कोण जोखड. आपण जसं कामाच्या वेळीं मुलांच्यापुढें चार खेळणीं टाकून देतों, त्यांतलाच प्रकार हा. फरक एवढाच कीं, मुलाला तीं खेळणींच जन्मभर आवडतील, अन् आपली त्याला कधींच गरज वाटणार नाहीं, अशी सोईची कल्पना आपण करून घेत नाहीं.

" कसे गेले माझे ते दिवस......कैक दिवसांत समजपूर्ण सहानुभूतीचा, कळकळीच्या विचारपुशीचा शब्द नाहीं. यंत्राप्रमाणें सदूचं सारं करावं, घरांतलं करावं. दिवस मालवला कीं थकून थकून निजून जावं, हेंच माझं जीवित झालं होतं. बाहेर बैठकींत हास्याचे फवारे उडत—गप्पाष्टकं झडत. पण माझा त्यांच्याशीं काय संबंध? मी माणसांच्या जगांतली थोडींच होतें?......सहा महिन्याच्या सदाशिवाला ताप आला. त्याच्या रडण्यापायीं मी रात्रीच्या रात्री जागून काढल्या. पण कुणाला पर्वा—

" औदासिन्य—पूर्ण औदासिन्य. खरोखर लीले, मोठमोठ्या आपत्तीपेक्षां, सहृदयतेच्या अभावींच जगांत केवढं दुःख पसरलं आहे......जिथं तिथं कौतुकाची मला मुळींच अपेक्षा नव्हती. दिवसभर कचेरींत काम उपसल्यावर त्यांनीं माझ्या जाग्रणांतला वांटा उचलावा, असंही मला कधीं वाटलं नाहीं. पण नुसती प्रेमाची विचारपूस! तेवढ्या एका शब्दानीं माझा थकवा पळून गेला असता. पण तेवढंही किती दुर्मिळ झालं......मग बाहेरच्या जगांतल्या घडामोडीं, इतर कशाच्या गप्पा, यांनीं माझ्या मनाला विरंगुळा पडणं तर दूरच......"

" कधीं कधीं मला वाटे, यापेक्षां नसतीं मुलं तर! मग तरी आमच्यांत एकभाव राहिला असता का? मग तरी आमचा दिवस याहून कमीं विभक्तपणांत गेला असता का!......पण सदूच्या आधींचे दिवस आठवत, कानावर आलेल्या निपुत्रिकांच्या गोष्टी आठवत,—स्वतःचं मातृहृदयही जागं होई, अन् वाटे, नको बाई......पुरवला हा एकटेपणा...दगडापेक्षां वीट मऊ. दुसरं काय?"

काकूंना इतकं उत्कटपणें बोलतांना मी कधींच पाहिलं नव्हतं. त्यांचा गळा मधून मधून दाटून येई—डोळे भरून येत. पण त्यांनीं पुरतं बोलून जिवावरचं ओझं काढून टाकायचा निश्चयच केला होता.

" पुढचा एक धक्का मुलांकडून यायचा...आपण त्यांच्यासाठीं एवढीं हाडाचीं काडं करावीं, एकपरीनें नवऱ्याकडूनही वाईटपणा घ्यावा, त्यांच्या निःसहाय लडिवाळपणावरून जीव ओंवाळून टाकावा. कधींकाळीं वैतागाच्या, थकव्याच्या भरांत एकादा अधिकउणा शब्द तोंडून गेला तर आपलंच मन आपल्याला खावं...अन् पुढें काय ? तर त्यांनींही आपल्याला केवळ एक स्वतःच्या सुखसोयीचं साधन समजावं. असा विचार करायला लागलं म्हणजे मला आमच्या जगन्नाथाच्या लहानपणची एक गोष्ट नेहमीं आठवतें. दुपारीं माझं खूप डोकं दुखत होतं. थोडं थोडं आंगही तापलं होतं. म्हणून पांघरूण घेऊन पडल्यें होत्यें. अडीच वाजतां जगू शाळेंतून आला तो " आई, खायला दे ना " असं ओरडतच. आजचा दिवस आपल्या हातांनीं घे, असं किती परोपरीनीं सांगितलं त्याला. पण अं हं. भणभणाऱ्या डोक्यांत विचार येऊन गेला कीं, पोरांना काय दुखण्याची किमत ? त्यावेळीं तो अर्थात् लहान होता, त्याला कांहींच उमज नव्हता. पण त्या गोष्टींत मला आतां जवळ जवळ पुढला इतिहास सांठवल्यासारखा वाटतो. मुलांच्या वाढत्या कर्तबगारीबरोबर आपला आनंद वाढतो; पण मोठेपणांतही आईच्या आईपणाची जाणीव ठेवणारे किती थोडे ? उलट बहुतेकांना आपली आई जुनाट वाटूं लागते—त्यांना तिची लाज वाटूं लागते. बायकोच्या बाळंतपणाच्या वेळीं तेवढी तिची घरांत गरज भासायची यांना..."

" असं आहे हें सारं लीले. दारिद्र्याची मला कधींच खंत वाटली नाहीं. कामाचे डोंगर उपसायला माझी अजूनही तयारी असते. पण माणसाला मायेच्या शब्दाची कधींतरी गरज भासते. निदान इतरांच्या कृतीमध्यें तरी आपल्याबद्दलची जाणीव आढळून आली तर मनाला समाधान वाटतं...पण आमच्या काळांत तरी फारच थोड्यांचं एवढं सौभाग्य होतं. बिचाऱ्या

स्त्रीहृदयाची सारी आस मायेच्या शब्दासाठीं......मला आतां वाटतं, कुणाजवळ नेहमींचं असं राहूंच नये असेच, चार दिवस इथें, चार दिवस तिथें घालवावे, अन् ध्रुवबाळानें जशी तपश्चर्या केली तशी आपणही करून परमेश्वराजवळ मागावं, "देवा, बिचाऱ्या स्त्रीहृदयाला कुठेंतरी कायमची निवाऱ्याची जागा दे!......"

काकू कांहीं वेळ स्वतःला पूर्णपणें विसरल्या होत्या. पन्नास वर्षांच्या जीवनांतील भकासपणा आज जणूं एकत्रित होऊन, त्याच्या खालीं त्यांचं अंतःकरण भारावून गेलं होतं. त्यांना बोलवेना. पण कुणासमोरही ढळढळां रडणें हें त्या मानी माउलीच्या स्वभावाला ठाऊक नव्हतें. बाहेर चाहूल लागतांच त्या भानावर आल्या व म्हणाल्या,

"जाऊं दे. काळ पालटतो आहे. तुला तर हें कधींच कांहीं जाणवलं नसेल...तो बघ विनायक आला वाटतं. पळ आपली......"

मी उठल्यें. पण माझीं पावलें कांहीं केल्या नेहमींच्या उत्साहानें पडेनात.

ऑगस्ट १९३४

# निराधार—!

आगगाडीच्या गतीनें विचारांना किती चालना मिळते! खिडकीबाहेरच्या झरझर बदलत्या दृश्याकडे पहातां पहातां दृष्टी केव्हां शून्य होते, हें कळत देखील नाहीं. नकळतच ती अंतर्मुख बनते व तितक्याच झपाट्यानें बदलणारीं विचारचित्रें पाहूं लागते. गाडीच्या अखंड आवाजानें विचारांत एकप्रकारची एकसूत्रताही येते. त्या दिवशी कितीतरी वेळ माझी अशीच तंद्री लागली होती. बायकांच्या डब्यांत फारशी गर्दी नव्हती. माझ्या बाजूचा लहान बाकांचा भागतर रिकामाच होता. कुणाचा संपर्क नसल्यामुळें माझ्या विचारांत विशेषच एकाग्रता आली होती. मावळत्या सूर्याच्या शांत तेजांत मन विलीन होऊन गेलें होतें.

पण थोड्याच वेळांत माझ्या समोरून पळणाऱ्या प्रदेशाचें स्वरूप इतकें पालटलें की, मी माझ्या तंद्रींतून जागी झालें. वेड्यावांकड्या आंखलेल्या काळ्या—भुऱ्या वावरांचा एकच एक निर्मनुष्य प्रदेश जाऊन हळूंहळूं घरें, रस्ते, माणसें दिसूं लागलीं. गाडीची गती कमी झाली व लवकरच स्टेशन आलें. मावळत्या सूर्याच्या कांहींशा उदास, वात्सल्यपूर्ण प्रकाशांत झोंपेला आलेल्या बालधरणीचें गुंगविणारें दृश्य कुठेंच नाहींसें झालें व हमालांची धडपड, चिवडेवाले, पानबिडीवाले यांची तीच ती बडबड व उतारूंची,

" अरे बाळू–सामान नीट पाहिलंस का—" वगैरे मासल्याची ओरड सुरू झाली. मी कांहींशा परित्यक्तपणेंच मागल्या फळ्यांच्या भिंतीवर पाठ टेकली व डब्यांतली ये–जा पाहूं लागलें.

याच स्टेशनवर माणिक माझ्या डब्यांत आली. तिच्याबरोबर तिची आई, दोन लहान भाऊ व आणखी एक कोणीतरी बाई होती. पण माणिक त्यांच्याबरोबर नसती तर ही मंडळी माझ्या डब्यांत चढल्याचें कदाचित् माझ्या लक्षांत आलेंही नसतें. रातराणीच्या सुवासासारखें माणिकच्या रूपाचें तेज होतें. त्यांत भडकपणा, रंगीतपणा, मुळींच नव्हता. आपल्या मृदुतेनेंच ती सहज चित्त आकर्षून घेई. ती इतकी नाजूक दिसे कीं, आपण फार मोठ्यानें बोलल्यानें सुद्धां ती दुखावली जाईल कीं काय, अशी शंका वाटे. तिच्या चेहऱ्यावर सदोदित एक तऱ्हेचें अस्पष्ट स्मित असे; परंतु सहज पाहणारालाही त्या हास्याभोंवतीं उदासीनता रुळलेली दिसे. या उदासीनतेंत असमाधानाचा अंशही नव्हता; चिडकेपणा नव्हता. उलट तींत अनिर्वाच्य शांतपणा व एकटेपणा भरला आहे, असें वाटे. त्यामुळें तिचें रूप खरोखरच रात्रींच्या अनंत एकांतांत दरवळणाऱ्या रातराणीच्या सुवासासारखें मनाला चटका लावून सोडी. तिच्या मुद्रेवर प्रतिबिंबित झालेल्या भावांचा उगम शोधून काढण्याची तळमळ लागून राही.

माणिकच्या आईकडे पाहिलें म्हणजे मला एकाच गोष्टीचें अत्यंत आश्चर्य वाटे. एवढी पंधरासोळा वर्षे माणिक तिच्या सहवासांत जगली तरी कशी असावी ? हवापाणी पाहूनच परमेश्वर आपल्या जीवनलतेचें रोपटें लावतो, असें म्हणतात. तेव्हां त्यानें तिच्यासाठीं केलेली घराची व मातेची निवड योग्यच असली पाहिजे, असें म्हणायचें. पण देह सोळा वर्षे टिकला, वाढला, म्हणजे जीवनलता जोमानें वाढली का? माणिकची आई कांहीं कर्कश बाई नव्हती. दिसायला काळी, शरीरानें मजबूत होती. पण तिच्याही चेहऱ्यावर माणिकसारखें ते गोड स्मित दिसून येई. हावभाव संभावितपणाचे, दानत दर्शविणारेच होते. परंतु त्या स्मिताभोंवतींच, त्या संभावितपणांतच

असें कांहीं तरी होतें कीं, माणिककडे मन जितक्या उत्सुकतेनें धांव घेई तितकेंच तिच्या आईपासून तें माघार घेई. तिच्या बोलण्याचालण्यांत करारीपणा ओतप्रोत भरलेला होता. पण त्या बाणेदारपणाला सन्मार्गावर ठेवणारें सौजन्य मात्र तिच्यांत दिसून येत नव्हतें. त्यामुळें बेधडकपणें आपल्या कशाही वासना पूर्ण करून घेण्याला लागेल तितका निष्ठुरपणा तिच्यांत असावा, असे मनांत आल्याशिवाय रहात नसे.

माणिकचे दोन भाऊ–ते खरोखरच तिचे सख्खे भाऊ असावेत का? तिनें सांगितलेल्या सर्वच गोष्टींबद्दल माझें मन आतां साशंक झाले आहे.

* * *

माणिकची मंडळी माझ्याकडेच वळली व माझ्या समोरच्या बांकावर त्यांनी आपलें प्रवासी बिऱ्हाड मांडलें. माझ्या खिडकीपाशीं मी एकटीच होतें. म्हणून माणिक हळूहळू तेथेंच आली. आमच्यामध्यें गाडीतल्या ठराविक प्रश्नोत्तरांना सुरवात झाली. ती मंडळी माणिकच्या कोणच्याशा भावाच्या लग्नाला पुण्याला चालली होती, असें मला कळलें. त्यांचें मूळचें रहाणे चाळीसगांवचें, तिथें माणिकचे मामा असत, वगैरे लौकिक गोष्टीही थोड्याबहुत कळल्या. परंतु एवढ्यावरच आमचें बोलणें थांबणें शक्य नव्हतें. त्या प्रवासांतील एकेका गोष्टीची मी आठवण करूं लागलें कीं आतां तरी मला एक अपूर्वच एकसूत्रता वाटूं लागते. नकळत मन ओढलें जावें व मग हेतुपुरःसर एकेक पाऊल पुढें टाकावें, त्याप्रमाणेंच आम्ही हळूहळू, एकेक विषय काढून, एकमेकींबद्दल माहिती काढीत होतों.

माणिकचें शिक्षण फारच बेताचें झालें होतें. पण मला तिच्या मनांत आणखी शिकण्याबद्दल फार उत्सुकता दिसली. मला थोडेसें वाईटच वाटलें. कारण तिच्या भोंवतालचा सारा प्रकार इतका निराशाजनक होता कीं, तिचा उत्साह म्हणजे केवळ असंतोषालाच कारण होईल कीं काय, अशी शंका माझ्या मनांत येऊन गेली. मी पुण्याला चाललें होतें व तीही शिक्षणासाठीं,

हें ऐकून तिला फारच गंमत वाटली. तिनें माझ्या शाळेविषयीं सर्व माहिती काढून घेतली. मॅट्रिकला खरोखरच फार अभ्यास करावा लागतो का, साधारण बुद्धीच्या मुलीला तिथवर जातां येईल का, वगैरे प्रश्नही अत्यंत साधेपणानें विचारलें. ती मधेंच थोडी थाबे, खिडकीबाहेर धांवणाऱ्या रुळांवर अस्वस्थपणें नजर लावी व पुन्हां अत्यंत कळकळीनें शाळेबद्दल कांहींतरी लहानसा प्रश्न विचारी. शिक्षण म्हणजे एक आपल्या मुक्तीचाच मार्ग आहे, अशी तिला जाणीव झाली असावी का ?

पुण्याच्या वाटेवर कल्याणचें स्टेशन म्हणजे एक मोठेंच ठाणें असतें. मजेशीर सोबत नसल्यास, एक्सप्रेस आतां या जन्मीं तरी खास येत नाहीं असें वाटण्यापर्यंत पाळी येते. चार पांच वर्षे शाळेच्या चकरा घालून कल्याणचे हमाल, तिकिट कलेक्टर वगैरे लोक आमच्या शाळेच्या मुलींच्या ओळखीचे झाले होतें, त्यामुळें आम्हांला तिसऱ्या वर्गानें प्रवास करून देखील कल्याणला दुसऱ्या वर्गाच्या वेटिंगरूममध्यें जाऊन नीटनेटकी वेणीफणी करायला व बाकीचा वेळ वाचत पडायला मुभा असे, एवढेंच नशीब मी माणिकला माझ्याबरोबर तिकडेच घेऊन गेलें. त्या नुकत्याच उमलूं लागलेल्या. नाजुक फुलानें थर्ड क्लास वेटिंगरूमच्या त्या धडपडींत जाऊन पडण्याची कल्पना मला कशीशीच वाटली.

दुसऱ्या वेटिंगरूमच्या भव्य आरशासमोर मी कुंकूं लावीत होतें. तों, पाठीमागें माणिक हातांत फणी घेऊन संदिग्धपणें उभी राहिलेली मला दिसली. मी म्हटलें, " मी मधें आलें का ?—या अशा. "

माणिकनें हळूंच वर पाहिले व ती म्हणाली, " ताई, माझी वेणी घालून देतां का ?—"

शाळेंत मी कितीतरी मुलींच्या बरोबर रहात होतें. कितीजणींची व माझी अगदीं दाट मैत्री होती . पण शाळेच्या कार्यक्रमांत—शाळेंतल्या आनंदी हूड-पणांत आम्हांला एकमेकींची वेणी घालून द्यायला क्वचितच सवड सांपडे. वेणी घालून घ्यावी किंवा द्यावी असें सुचण्याइतका हळुवार प्रेमळपणाही

आमच्यामध्यें फारसा नव्हता. माणिकच्या प्रश्नानें मी क्षणभर स्तब्धच झालें. तिच्याबद्दल वाटणारी अतर्क्य कळकळ एकदम दुणावल्यासारखी वाटली. तिच्या लांब सडक केंसांवरून हात फिरवावा, तिला जवळ घ्यावी व " हो, घालतें बरं बाळ..." असें म्हणावें, असें वाटलें. पण मी चटदिशीं एवढेंच म्हटलें, " हो—घालतें तर.—तुमचे केस किती सुरेख आहेत हो......"

पुण्याला पोंचेपर्यंत आमचें बरेंच बोलणें झालें. कसेंही करून माझ्या शाळेंत येण्याचा माणिकनें निश्चय केलेला दिसला. तिनें हंसत हंसत, कांहींशा लाडिकपणें आपल्या आईलाही तसें सांगितलें. आईनें तिला वरवर तरी उत्तेजनच दिलें. ती म्हणाली, " हो, हो; पाहूं कीं जमलं तर. भाऊंना सांग तूं सारं......" तिचे शब्द अगदीं स्वाभाविक वाटले. पण तो स्वाभाविकपणाच होता, की तें संभावितपणाचें अस्सल कसब होतें ?—कांहीं असो. माणिक माझ्या शाळेंत येण्याचा दिवस उगवेल अशी मला फारशी आशा वाटली नाही. माझ्या मनांत असेंही आलें—या बाईच्या कपाळीं कुंकू आहे, ही चांगली सुखवस्तु व कुलीन दिसते. मग हिच्या मुलीला शाळेंत पाठविण्याबद्दल हिच्या भावाला विचारण्याची काय गरज असावी ? परंतु खरोखरच तो दिवस उगवला. माणिकची एकदोन पत्रें आलीं व नंतर ती खरोखरच शाळेंत आली. तिला बऱ्याच खालच्या वर्गात बसावें लागलें. तिथेंही तिची बुद्धिमत्ता जेमतेमच चमके. पण तिनें आपल्या गोडपणानें मात्र सर्व शाळेचें चित्त वेधून घेतलें. ती कोणाशीं विशेष बोलत नसे. इतर मुलींचा आनंदीपणा, हूडपणा तिच्यांत कधींच दिसला नाहीं. पण मला गाडींत दिसलेली तिची उदासवाणी वृत्ति मात्र फारशी दिसली नाहीं. शिक्षणाची संधी मिळाल्यामुळें तिला थोडेसे पंख फुटले होते का ?

तिचा व माझा एके ठिकाणीं रहाण्याचा योग फारच थोडे दिवस आला. ती माझी शेवटलीच टर्म होती. सुट्टीनंतर मी पुण्यालाच कॉलेजमध्यें गेलें. पण तेव्हांही माणिक शाळेंत आलेली पाहिल्यावर मात्र मला अतोनात

आनंद झाला. आतां तिचें पाऊल स्वच्छ सूर्यप्रकाशित मार्गावर स्थिर झाल्यासारखें मला वाटलें—पण ती अंधारांत कधीं होती? मला असें वाटायचें कारण काय?

मला असें वाटे खरें. या वाटण्याला आधार प्रथम माझ्या कॉलेजांतल्या एका मैत्रिणीकडून मिळाला. रविवारचा दिवस होता. माणिकला मी माझ्याकडे रहायला आणलें होतें. दुपारीं मी तिला आमच्या सर्वांच्या खोल्या, कॉलेज वगैरे दाखवायला घेऊन निघालें. हिंडतां हिंडतां आम्ही चाळीसगांवच्या एका मुलीच्या खोलीपाशीं आलों. ती खिडकींतून मला पाहून ओरडली,—"कुणीकडे निघालां बाईसाहेब?–आज झोंप नाहीं वाटतं काढायची–" पण माझ्याबरोबर माणिकला पाहून ती गप्पच बसली. आमचें कांहींतरी औपचारिक बोलणे होऊन माणिक व मी पुढें गेलों. पण माणिक व ती मुलगी दोघीही एकमेकीला पाहून चमकल्या, हे माझ्या नजरेंतून सुटलें नाहीं.

संध्याकाळीं ती मुलगी आपणहूनच माझ्याकडे आली व माणिकबद्दल मला माहिती विचारूं लागली. ती तिथेंच शाळेंत असल्याचें ऐकून तिला फारच आश्चर्य वाटलें. मी तिला खोदखोदून विचारल्यावर ती म्हणाली, "कांहीं नाहीं ग—या मुलीला मी चाळीसगांवला बऱ्याच वेळां पाहिलेली आहे. तिच्या घराण्याचं नांव विशेषसं बरं नाहीं.......तिचे वडील बेपत्ताच आहेत. तिच्या आईच्या दुर्वर्तनामुळें त्यांनीं संसाराला रामराम ठोकला, अशी लोकांची समजूत आहे. तिची आई व भावंडें कोणा एका मानलेल्या भावाजवळ राहतात म्हणे—"

माणिकच्या मोकळेपणाला या गोष्टीची कीड लागली होती तर! तिऱ्हाइताच्या घरांत राहून तिला तिच्या वयापलीकडच्या गोष्टींची जाणीव झाली असावी. कधीं लोकांचें बोलणें कानीं पडलें असेल—कधीं घरांत एकादा किळसवाणा प्रकार दृष्टीस पडला असेल—

*   *   *

माणिकशीं मी त्या विषयावर कधीच बोलूं शकलें नाहीं. तिच्याही तोंडून शब्द फुटला नसावा. ती माझ्याजवळ एकटीच असली कीं तिच्य मनांत काहूर माजलें असावें, असें वाटे. ती माझ्या अगदीं जवळ येऊन बसे. "काय झालं..." विचारलें कीं म्हणे, "कांही नाहीं—मला किनई तुम्ही फार आवडतां..." कधीं कधी म्हणे, "तुमचे माझ्यावर किती उपकार आहेत. तुमच्यामुळें मी शाळेत येऊं शकलें. मी आतां खूप अभ्यास करीन......"

परंतु हा निश्चय पार पाडणें तिच्या एकटीच्या हातचें नव्हतें. तिला लवकरच पुण्याच्या त्या कंटाळवाण्या मलेरियानें पछाडलें. आठवड्यांतून दोन वेळां तरी तिला थंडी वाजून येई. एक दिवस ती अशीच तापानें फण-फणली असतां मी तिला भेटायला गेलें. ती फारच निराश व अस्वस्थ दिसत होती. मला म्हणाली—

"ताई, माझं कसं होणार......"

"काय झालं त्यांत ? मलेरियाच्या तापाला काय घाबरायचं......"

ती एकदां उदासपणें हंसली व म्हणाली, "हं, मी तापाला घाबरत नाहीं...मी लवकर बरी झालें नाही तर मला घरीं पाठवतील—"

"मग त्यांत काय बिघडेल ?" मी मुद्दामच म्हटलें, "घरच्या विश्रां-तीनें प्रकृति लवकर सुधरेल......"

"विश्रांति !" ती क्षणभर थांबली व म्हणाली, "सगळ्यांनाच घरीं विश्रांति मिळते असं नाहीं !"

त्यावेळी ती इतकी भेदरलेली दिसत होती कीं, कदाचित् थोडा अवसर सांपडता तर तिनें मनांतलें सर्व सांगून टाकलें असतें. बिछान्यावर पडल्या-पडल्या तिला आपल्या भविष्याचें चित्र निर्वेधपणें रंगवायला सवड मिळाली होती. तापाच्या ग्लानींत त्याचा भेसूरपणा फारच तीव्रतेनें जाणवला असावा. त्या गोंधळलेल्या मनःस्थितींत ती बहुतेक सर्व बोलून गेली असती. पण

तसें व्हायचें नव्हतें. माणिकची मनःस्थिती मला कधींच कळायची नव्हती शाळेच्या डॉक्टरच्या स्वरूपांत दैव आडवें आलें.

पुढें तीनचार दिवस माझें तिच्याकडे जाणें झालें नाहीं. पांचवे दिवशीं मला एकदम कळलें कीं, माणिकला अशक्तपणा फार आल्यामुळें तिला विश्रांतीसाठीं घरीं पाठविण्यांत आलें. माझ्या पोटांत धस्स झालें. जाण्या-पूर्वीं तिची व माझी भेट देखील झाली नाही. पण एवढेंच नव्हे. घरीं तिची प्रकृति सुधारेलच याबद्दल मला खात्री वाटेना. मी तिला निकडीनें पत्र पाठविलें व कसेंही करून मन शांत ठेवून प्रकृति सुधारण्याबद्दल विनविलें. एक दोन खुशालीच्या कार्डानंतर मला तिचे सविस्तर पत्र आलें.

"......मी कधींच बरी झाले. ताप अगदी येईनासा झाला, व आतां अशक्तपणाही विशेष वाटत नाही. मग तुम्ही म्हणाल, मी आतां येत कां नाही? वार्षिक परीक्षा तर जवळ येत चालली. पण ताई, सत्याग्रह दरवेळी यशस्वीच होतो, असं नाही.—अन् कुणासाठीं एवढी धडपड करायची? माझं शिक्षण झालं काय किंवा न झालं काय—त्याचं कुणाला काय वाटणार?

पण छेः! ताई, मला या निराश मनस्थितीतून बाहेर काढणं केवळ तुमच्यावर अवलंबून आहे. मी नाहीं जाणार—आतांपर्यंत केलेले श्रम आतां वायां जाऊं देणार नाहीं. तुम्ही नेहमी किती धीर देतां—

खरं सांगायचं म्हणजे, इथें एक नवीनच टूम निघाली आहे माझ्या मामांच्या ओळखीचे एक श्रीमंत गृहस्थ आहेत. माझ्यापेक्षां त्यांचं दुपटीनें वय असावं. पण त्यांच्याशींच माझं लग्न व्हावं, असं आईनें मनांत घेतलं आहे.—पण जाऊं दे. ज्या गोष्टी कधी खऱ्या होणार नाहींत त्या सांगून मी तुम्हांला कशाला निष्कारण त्रास देऊं?—"

मला जरा काळजीच वाटली. पण ३०–३२ वर्षांच्या श्रीमंताशीं माणिकचें लग्न झालें तर त्यांत विशेषसें वावगें काय होणार होतें? मी त्याप्रमाणें लिहिणारही होतें. पण दुसऱ्याच दिवशीं मला तिचे पुन्हां पत्र आलें. तें पत्र म्हणजे एक अत्यंत उत्कट हांक होती. मला माणिकचे

आशेचे, धैर्याचे सर्व धागे तुटल्यासारखे वाटले. कसेंतरी करून धरून निघून शिक्षणासाठीं येण्याकरितां तिनें किती स्वैर मार्ग सुचविले होते !—मी स्वतः अजून विद्यार्थीदशेंतच असतांना तिला काय मदत करूं शकणार—तिला कुठला आसरा देणार ? तिला तर दुसऱ्या कोणाचाही आधार नव्हता, हें उघड होतें.—पण माणिक इतकी घाबरली कां ? केवळ शिक्षणाबद्दलच्या निराशेनें ?—कां तो श्रीमंत गृहस्थ दुर्वर्तनी असावा ?

गोंधळलेल्या मनःस्थितींत मी तिलाच पुन्हां पत्र लिहिलें. धीरानें जरा जुळतें घेऊन, आपली सर्व शक्ती एकवटून एक वर्षासाठीं तरी शाळेंत निघून येण्याचा प्रयत्न करण्याविषयीं मी तिला सांगितलें.

तें पत्र तिच्या हातीं पडलें कीं नाहीं कोण जाणे...जवळ जवळ महिनाभर मला तिची कांहींच बातमी लागली नाहीं. माझ्या २–३ पत्रांचींही उत्तरें आलीं नाहींत. मला वाटलें, माणिकनें लग्नालाच रुकार दिला असावा त्या लग्नाची कल्पना मला माझ्या त्या चाळीसगांवच्या मैत्रिणीनें दिली—

एक दिवस सहज आमच्या सौंदर्याविषयीं गप्पा चालल्या होत्या. माझी मैत्रीण एकदम म्हणाली, “ सौंदर्य नसलेलंच पत्करलं बुवा. त्या तुझ्या माणिकची पहा काय अवस्था झाली आहे ! ”

“ काय ग ?—” मी विचारलें.

“ तुला नाहींच का कळलं ? ” ती उद्गारली. “ एका श्रीमंताच्या तावडींत सांपडली आहे ती. तिच्या आईनंच तिला बाजारांत बसवल्यावर तिच्या सौंदर्याची हीच अवस्था होईल नाहीं तर काय !—”

तिचें पुढलें कांहींच बोलणें मला ऐकूं आलें नाहीं. यालाच का माणिक लग्न म्हणत होती ?—कां तिच्या डोळ्यांत धूळच फेंकली गेली होती ? हें संकट टाळायला तिनें ते स्वैर मार्ग सुचविले होते ना ! बाप देशोधडीला, आई तिन्हाइताच्या घरीं सुखानें रहाणारी, मामा मानलेला—माणिकच्या पवित्र मनःसुमनाची पर्वा कोण करणार ?

दुसऱ्याच दिवशीं मला माणिकच्या मामाच्या सहीचें पत्र आलें. त्यांत एकदोनच वाक्यें होतीं: " कळविण्यास अत्यंत वाईट वाटतें कीं, आमची भाची आपली मैत्रीण चि. माणिक हिस १५ दिवसांपूर्वी दोषिक ताप येण्यास सुरवात झाली व परवां रात्रीं तिला देवाज्ञा झाली. "

—माझी माणिक गेली. कुठें गेली? जगांत तिच्याकडे सर्वांनीं पाठ फिरवल्यावर ती खरोखरच देवाघरीं गेली का? हवापाणी न मानवल्यामुळें फूल आपोआपच मिटलें गेलें, कां उन्मत्त बेफिकिरीनें कोणीतरी तें उगीचच तोडून, हुंगून फेंकून दिलें?—माणिकच्या मामाच्या पत्रावर माझा अजूनही विश्वास बसत नाहीं. तिची आठवण झाली, कीं तिचे ते उदास डोळे दिसूं लागतात. ती कुठें तरी अंधारांत उभी राहून मला बोलावीत आहे असें वाटूं लागते.—

आक्टोबर १९३१

---

# चिमणी *

अगदीं बालपणापासून चिमणीला कपड्यांचा कोण कंटाळा! किंचित् स्पर्शज्ञान आल्यापासून तिनें आंघोळीच्या वेळीं पाण्यांत डुंबायला मिळालें कीं स्तब्ध व्हावें; आनंदलोकाप्रत पोंचलेल्या एखाद्या योग्याची शांति धारण करावी व पाण्याबाहेर निघून कपड्यांचा स्पर्श होतांच ठणठणाट करावा! ती दोनअडीच वर्षांची झाली तेव्हां तिला आपल्या मऊ गोंडस अंगाचा कोण अभिमान वाटे! मोठ्या आरशासमोर उघडें भप्प बसून स्वतःचें पोट कुरवाळण्याची तिला अतिशय हौस होती. पण तिकडून आई येई व तिनें म्हणावें, " चिमे, छीः छीः, असं बसूं नये बाळ...हंसतील ना लोक!"

कांहीं दिवसांनीं बिचाऱ्या चिमीला उघडें रहावयाची लाजच वाटूं लागली! इतकेंच काय,—चार पांच वर्षांची होतांच ती व्यवस्थितपणा, काय बरें दिसतें, काय नाहीं, वगैरेंच्या शास्त्रांत पूर्ण पारंगत झालीं. कधींकाळीं जर आईनें म्हटलें, " चिमे, आज नुसते बूटच घालून जा आपली फिरायला. बरे आहेत हे कपडे." तर चिमणीनें प्रथम आनंदानें एक उडी मारावी, पण लगेच म्हणावें, " छीः आई, काय वाईट झाला आहे हा फ्रॉक! लोक काय म्हणतील मला!"

*　　　*　　　*

चिमणी भराभर शिकत होती, वर्गामागून वर्ग ओलांडत होती व या शर्यतींत तिचा नेहमीं पहिला नंबर असे.

पण चिमणीच.होती ती. सकाळची शाळा झाली कीं, वसतिगृहाच्या मुलींना अभ्यासाचा विशेष हुरूप चढे. दुपारच्या वेळीं चिमणी आपल्या पुस्तककांचा गठ्ठा घेउन एका दूरच्या वर्गाच्या खोलींत जाऊन बसे. त्या वर्गाच्यामागें व्हरांडा होता. पलीकडे अंगण व शांत बगीचा होता. तेथें किती तरी फुलपांखरें निर्भरपणें हिडत. कोपऱ्यांत एक चिंचेचें झाड होतें. त्याचीं कोवळीं पानें अडीच वर्षाच्या चिमणीच्या डावल्याइतकींच नाजूक नव्हती का ? पलीकडे एक आंब्याचें झाड होतें. परीक्षेच्या अगोदर तें हटकून मोहरानें फुलून गेलेलें असें. वाऱ्याच्या झुळकीबरोबर त्याचा सुवास चिमणीपर्यंत येऊन पोंचला कीं, तिच्या मनांत अतर्क्य खळबळ उडे. पुस्तकांचा गठ्ठा कुठें तरीच राही ! एखादी संस्कृत कविता पाठ करण्याच्या निमित्तानें, तिचा चरण गुणगुणत चिमणी आंब्याकडे जाई—लवलेल्या डहाळ्यावरचा मोहर नाजुकपणें कुरवाळी, हुंगून घेई, एकादी कैरी पडलेली सांपडल्यास चट्दिशी ओच्यांत घाली. कधीं कधीं तर तिला त्या आंब्याच्या झाडाचा इतका लोभ येई कीं, दोन्ही हातांनीं त्याच्या बुंध्याला विळखा घालून ती किती तरी वेळ उभी राही, वर मान करून पानांमधून लवलवणाऱ्या सूर्यकिरणांकडे पहात राही.

—पण तिला मध्येंच आठवण होई ! " अभ्यास ! आज दहा पानांची तरी उजळणी संपली पाहिजे ना ? नाहीं तर अभ्यास संपणार कसा ?— आणि नाहीं संपला तर माझा नंबर ! छेः ! माझाच पहिला नंबर आला पाहिजे ! "...तिच्या स्वाभाविक विश्वांत प्रेम होतें, समता होती, आंब्याचिंचेपासून तों मैत्रिणीपर्यंत सर्वांना तेथें जागा होती. तिला सांपडलेल्या कैरींत वांटेकरी व्हायला एखादी तिची सखी धांवत आली असती, तर तिला कैरीबरोबर मीठच मिळाल्यासारखें वाटलें असतें. पण पहिला नंबर ! " माझाच, माझाच आला पाहिजे पहिला नंबर ! नाहीं तर बाई काय म्हणतील ? संस्कृतचे मास्तर किती हिणवतील..."

* * *

चिमणी कॉलेजमध्यें गेली. तिनें आपल्या बुद्धिवैभवाची कीर्ति कायम राखली होती. सर्व प्रोफेसरांना ती एक नमुनेदार विद्यार्थिनी वाटे; तिच्या शंका निवारण करायला त्यांना हौस वाटे. कॉलेजच्या विश्वांत वेगवेगळ्या व्यक्तींविषयीं बरेंच मतवैचित्र्य होतें, पण सर्व तऱ्हेच्या कंपूंना चिमणीचें कौतुक वाटे. तिच्याविषयीं अभिमान वाटे. चिमणीला या गोष्टीची जाणीव होती. तीही सर्वांशीं सारखी वागे.

पण—

थोड्याच दिवसांत रघूवर तिचे नेत्र खिळूं लागले. खूप मोठ्या बाजार-पेठेंत हिंडतां हिंडतां एकदम एखादें जीवाभावाचें माणूस भेटावें तसें तिला झालें. रघूला पाहिलें कीं तिच्या कणाकणांत चैतन्य खेळूं लागे. आपली बालपणचीं, शाळेतली, सारीं विचारस्वप्नें तिला आठवत. आपण पाहिलेल्या सर्व रम्य जागा—टेकड्या, विहिरी, आंबराया—रघूला दाखवाव्या, त्याचा हात धरून त्याला तिथें हिंडवावें, गाणीं म्हणायला लावावीं व त्याच्या तोंडाकडे पाहत आपण तीं ऐकावीं, असें तिला वाटे.

ती कितीतरी वेळ विचारांत दंग राही. एके दिवशीं तिच्या पलीकडल्या खोलींत बोलणें चाललें होतें. “ चिमाबाईचं बाकी अलीकडे अभ्यासांतलं लक्ष उडालं, बरं का ! मन बिघडलं ! !—प्रिन्सिपॉलसाहेबांना म्हणावं, आतां पहा तुमचा नमुनेदार विद्यार्थी...”

चिमणीला कोणीतरी कळ्या कुस्करीत आहे असें वाटलें.

रघूही तिच्यासारखाच स्वप्नांत दंग असे. पण तो जास्त कणखर मनाचा होता. तो तिला म्हणे, “ चल ना फिरायला. संध्याकाळीं तर तुझा अभ्यास नसतो ? आपण त्या तुझ्या आवडत्या ओढ्याकडे जाऊं. ”

चिमणीचें तोंड उतरून जाई. तें कॉलेजचे जग कसे होते......ती म्हणे, “ रघू, पोरं काय म्हणतील...”

रघू हंसे—“ अन् आली नाहींस तर मला काय वाटेल ? उद्यां माझा अभ्यास होईल का ? ”

चिमणी चालूं लागे. पण तिच्या विचारस्वप्नांतला मोकळेपणा कुठल्या कुठें लोपून जाई. ओढ्याजवळ जाईपर्यंत तरी रस्त्यानें कोण भेटतें इकडे तिचे डोळे लागत. तिच्या निर्मल अमृतांत अश्रु मिसळले जात.

*   *   *

चिमणीला वाटे, आतां आपण कशाला जुमानीत नाहीं—रघूचें व आपलें विश्व आतां सर्व जगाच्या वर, लौकिक मूल्यांच्या पलीकडे आहे ! रघूचें व तिचें एक लहानसें शांत–शांत घर होतें.

एके दिवशीं तें घर एका कोमल, कातर, पण आपल्या महत्त्वाच्या जाणीवेनें परिपूर्ण अशा आवाजानें दुमदुमून गेलें. चिमणीचा जीव विस्म-यानें, नाविन्यानें भरून गेला. तिचें मातृहृदय उचंबळून आलें.

आपल्या बाळाचें तिला कोण कौतुक वाटे ! तो आपल्या मुठी खात, पाय आपटीत पडला कीं, ती त्याच्याकडे एकसारखी पाहत राही. त्याच्या तऱ्हतऱ्हेच्या आवाजांनीं तिला हर्षाच्या उकळ्या फुटत. तिला पुन्हा स्वतःच लहान झाल्यासारखें वाटे, व बोबडे बोल आठवत.

आनंद मोठा झाला, तरी चिमणीच्या तोंडचे बाळशब्द विरेनात. तो चांगला चालूं बोलूं लागला, दंगामस्ती करूं लागला. तरी चिमणीनें त्याला 'छबड्या,' 'चिमकुल्या,' म्हणावें; त्यानें कांहीही मागितलें की चिमणीला 'नाहीं' म्हणणें असह्य व्हावें. त्यानें हांक मारली कीं तिच्या उत्तरांत तिच्या जिवाची सारी उत्कटता भरून राही. तो जरासा कुठें पडला कीं, तिला वाटे, धांवत जाऊन त्याला उचलून घ्यावें, आपल्या मिठींत त्याला अगदीं दडवून टाकावें.

—पण तिनें " शिशुमानसशास्त्र " वाचलें होतें ना ? तें तिला सांगे " अशानें मुलें लाडावतात, भित्रीं होतात–पुढेंही त्यांचा भ्याडपणा जात नाहीं. " मग ती जीव मुठींत धरून मागें राही व मोठ्या प्रयासानें म्हणे,— " कांहीं नाहीं रे बाळ–उठ, तो बघ उंदीर पळाला ! "

*   *   *

चिमणी खूप मोठी झाली होती. तिच्या गांवच्या स्त्रियांची ती पुढारी बनली होती. तिचा व्यासंग, तिचें वजन, वगैरे जाणून सरकारनें तिला जे. पी. केलें. त्यामुळें तिला कचेरीचें काम पडेच. पण इतरही भाराभर सभाव्याख्यानें सुरू असत. वक्तशीरपणा व वक्तृत्व यांबद्दल तिची ख्याति होती. तसेंच न्यायदानाच्या कामांतही तिच्या बुद्धीची कुशाग्रता स्पष्ट दिसे. स्त्रीजातीला योग्य न्याय देण्याची केवढी अमोल संधि तिला मिळाली होती.

पण अजूनही ती चिमणीच होती! कधीं कधीं तिला या सर्वात केवळ बडेजाव वाटे व त्याचा अतोनात कंटाळा येई. ती बाहेर कोणत्या तरी एखाद्या बड्या कर्तव्याला जायला निघाली की आनंद येई, तिच्या पायाला अत्यंत लडिवाळपणें विळखा घाली व म्हणे—"आई माझ्याशीं खेळ ना ग!" एखादे वेळीं संध्याकाळींच जायची पाळी आली कीं, तिचा पाय घरांतून निघतां निघूं नये. तिला वाटे, ही रघूची घरीं यायची वेळ, एकट्यानेंच चहा घ्यायला कसं वाटेल त्याला? कसेंबसें जाऊन अर्धवट उत्साहानें भाषण करण्यापेक्षां इथेंच बसणें काय वाईट? या आपल्या बागेंत किती सुंदर फुले उमलली आहेत–आनंद किती मजेंत बागडतो आहे! इथेंच दोन खुर्च्या टाकून विश्रब्धपणें बसावें—उडत जाईना कां ती सभा—ती जे. पी. ची पदवी!

लगेच तिच्या मनश्चक्षूंसमोर वृत्तपत्रांचे रकाने दिसूं लागत; पुराणमतवाद्यांचे उद्गार तिला ऐकूं येत..." कितीही झालं तरी बायकाच त्या–स्त्रियांचं राज्य चुलीपुरतंच–जबाबदारीची कामं अंगावर घ्यावयाची हौस, पण ती पार पाडण्याची कर्तबगारी त्यांच्यांत येणं शक्य नाही..." चिमणी खिन्नपणें आपलें मन आवरी व वाट चालूं लागे......

एप्रिल १९३३

---

# भय्या -१-१-५१

त्याचें खरें नांव रामचरण. पण आमच्या घरी आल्यापासून त्याचें नांव भय्याच पडलें होतें. भय्या ही आमच्या घरची एक संस्थाच आहे. रोज सकाळसंध्याकाळ चुलीपुढें कांहीतरी धुमाकूळ घालून कशीतरी आमची क्षुधाशांति करायची, हा या संस्थेचा उद्देश. हा धुमाकूळ घालायला कशा तऱ्हेची व्यक्ति येते, याच्याशीं आम्हांला काय कर्तव्य ? फार तर ती व्यक्ति नीटनेटकी आहे की नाहीं, आपल्या कामांत विश्वासू, चोख आहे की नाही, याबद्दल आम्हीं चौकशी करूं. पण त्या माणसाच्या आईने त्याचें नांव काय ठेवलें, याच्याशीं आम्हांला काय कर्तव्य ?

आमच्या वहिनी तर या व्यक्तिविषयक दृष्टिकोनाच्या पार पलीकडे गेल्या होत्या. विलायतेंतल्या कांही अत्यंत पुढारलेल्या दुकानांच्या दरवाज्यावर यांत्रिक मूर्ति ( robot ) असतात. दिसायला चिलखत घातलेल्या माणसांप्रमाणें दिसून त्या आपली ठराविक कामें, ठराविक हालचाली, बिनचूक करीत असतात. या रोबोविषयी त्यांच्या धन्यांचे कांही भावनासंबंध असतील का ?

एक दिवशी सकाळींच रामचरण आमच्याकडे नोकरीच्या शोधांत आला. आम्ही नुकतेच चहा आटोपून सकाळच्या उन्हांत गप्पा मारीत बसलों

होतो. डोक्याला धोतर गुंडाळलेली व हातांत एक लांब गुळगुळीत सोटा घेतलेली ही मूर्ति तिथें उन्हांतच कांहींशी कुडकुडत उभी राहिली व म्हणाली " वो बंगलेपरके श्रीरामनें भेजा, बाइसाब ! "

तो अगदीच पोरगासा होता. पण पुष्कळ हिंडलेल्या माणसाचा धीटपणा त्याच्या चर्येवर दिसे. बोलतांना तो किंचित् हंसे. त्याच्याकडे पाहतांक्षणीं असें वाटे कीं या प्राण्याला कुठेंही फेंकला तरी तो मजेंत राहील.

वहिनींनीं आपली ठराविक प्रश्नावली त्याच्यापुढें टाकली. आधीं कुठें होतास, नोकरी कां सोडली, स्वयंपाक येतो कां, सोंवळें नाहीं ना—वगैरे सर्व विचारून झालें. मग सचोटीनें काम करणें, कपबशा न फोडणें, चांदीचीं भांडीं जपून वापरणें वगैरे सांगून होतांच त्याचा आमच्या गृहचक्रांत समावेश झाला. रामचरणचा भय्या झाला.

वहिनींच्या देखरेखीखालीं भय्याचें कामकाज सुरू झालें. आम्हीं जेवायला बसलों, तेव्हां आमच्या जुन्या गयाप्रसादच्या पाककौशल्याच्या ऐवजीं रामचरणचा काहींसा नवीन मुग्धपणा आमच्यापुढें आला. पण त्या पहिल्या दिवशीही कशांत कांहीं फरक नव्हता. जेवणाची रुचि रेंसभरही ढळली नाहीं, किंवा तिच्यात निराळेपणा आला नाहीं. बरोबरच होतें ! गयेच्या प्रसादानें माणसाचें जीवन व्यतीत होत असो, किंवा श्रीरामचंद्राच्या चरणांची त्यानें आस धरली असो, एका ठराविक चक्रांत सांपडल्यावर त्याच्यांतला निराळेपणा, त्याचें वैयक्तिक कौशल्य कसें टिकावें ? जुन्या भय्याच्या जागीं नवा भय्या आला, पण तेंच सामान, तीच पद्धत, तीच शिस्त. पाटपाण्याच्या जागेंत देखील एका इंचाचा फरक नव्हता.

एक फूल गळतें—त्याच्या जागी दुसरें उमलतें. लतेला काय वाटत असेल, कोण जाणे—पण बाग तरी तशीच हंसत फुलत राहिलेली दिसते.

आमच्या घरांत–दादा वहिनीच्या घरांत–माझ्याशिवाय आणखी एक आमच्या म्हाताऱ्या काकीच होत्या. आमचीं तिघांचीं जीवितचक्रें सुरळित चाललीं होतीं. त्या गतीमुळें आपण पुढें सरकत आहों, असा भास होत

होता; आपल्या आकांक्षांच्या वैयक्तिक पूर्णतेच्या, जवळ जात आहों, अशी मनाची समजूत होत होती. दादावहिनी याच जीवित–पूर्तीच्या स्वप्नांत दंग होते. त्यांच्या, माझ्या, इतर सर्वांच्या जीवितांतील अखंड सारखेपणा सर्वांच्या जीवनाचा एकच शेवट, जरा विलग वृत्तीनें पहायला सवड काय ती मला एकट्यालाच होती. भोंवताली पाकळ्यांचा सडा पडलेला असूनही हंसणारी कळी, पिकल्या पानाच्या शेजारीच जीवनाच्या उन्मादानें लवलव करणारे अंकुर, पिढ्यामागून पिढ्या अचूकपणें अपुऱ्या राहणाऱ्या आकांक्षा दिसत असूनही आत्मविश्वासानें त्याच मार्गावर पाऊल टाकणारे मानव,– हीं दृश्यें पाहून माझें मन कधींकधीं फार उदास होत असे.

आमच्या काकींचें जीवितचक्र मात्र काही काळ तरी थांबल्यासारखेंच झालें होतें. माझी मॅट्रिकची परीक्षा होऊन मी कॉलेजमध्यें जाण्यासाठी दादाकडे आलों, तेव्हां काकी जशा होत्या तशाच हुबेहुब त्या आतांही होत्या. त्यावेळीं त्यांचा जो दिवसभराचा क्रम होता तोच आतांही होता. एक रेंसभरही कुठें बदल नव्हता, फरक नव्हता. मला काकी कुठें बाहेर गेलेल्या आठवत नव्हत्या–त्यांची दुपारीं बसायची, रात्री निजायची जागाही बदललेली आठवत नव्हती. कित्येक वर्षांपासून त्यांच्या जीवनाचा प्रवाह एकदम स्तब्ध झाला होता. मग एकदम एक प्रचंड उडी मारण्यासाठी तो शक्ति सांठवीत होता की काय नकळे! येतांजातां एकादे वेळीं मी त्यांना म्हणावें–" काकी, कंटाळा नाही का येत रोज फुलवाती करीत बसायचा?" यावर त्यांनीं म्हणावे. " आतां रे काय नवीन असायचं, भाऊ? तूंच बसून दोन नवीन गोष्टी सांगशील तर. जग रोज बदलतं –पण माझा त्याच्याशीं काय संबंध?"

रामचरण आल्यामुळें मात्र काकींना एक नवीन करमणूक झाली. त्याच्या हंसऱ्या चेहऱ्यानें काकीना आल्हाद होई. त्याच्या पोरपणानें काकींचं वात्सल्य जागें होई. सकाळीं तो पोळ्या करीत बसला कीं काकी पूजा आटोपून स्वयंपाकघरांत वाती करीत बसायच्या. रामचरणच्या गप्पांना तेव्हां कोण

रंग चढे ! त्याच्या घरच्या शेताची चित्रें त्याला दिसूं लागत. हंसतहंसत "क्या कहूं काकीबाई !—" असं म्हणत त्यानें सुरुवात करावी. तो हातानें झरझर पोळ्या लाटीत असे. पण त्याच्या डोळ्याला कापणीस आलेल्या शेतांतील गहूं वाऱ्यानें हळूंच डोलतांलवतांना दिसे. त्याचें चित्त आंब्याच्या झाडाखालीं बसून, कैऱ्या खात, गुलेल विणीत बसलेली आपलीच बालमूर्ति पहाण्यांत रंगून जाई. एकदां राखण करतांना त्यानें गोटा इतक्या जोरानें भिरकावला होता......

एकदां काकींनी त्याला विचारलें, "का रे, तुला मग या स्वयंपाकाचा कंटाळा येत नाहीं का ?"

रामचरण त्याच हंसऱ्या चेहऱ्यानें वर पाहून म्हणाला, "चलाही है काकीबाई—दुनिया चलती है. कोई दिन ऐसे–कोई वैसे.......घडी का कांटा दसपे गया. चलो रे भय्या, भगो........." असें म्हणून त्यानें पोळपाट–लाटणें घेऊन एक उडी मारली व मोरीत गेला.

त्यालाही जीवितचक्राची जाणीव झाली होती. दुनियेच्या गतीपुढें आपल काय, हें त्याला कळत होतं कां ?—आणि तरीही तो आनंदी होता !

* * *

एकदां रात्रीं बऱ्याच उशीरां मी भटकायला निघालों. अंधारी रात्र होती. पण माझ्या मनालाही त्या वेळीं नुसना चांदण्यांचाच प्रकाश हवा होता. चंद्रप्रकाशांत नेहमींच चकोराचें गीत भरलेलें असतें. त्यात जाई-जुईचा सुवास सांठवलेला असतो. या सर्वाचा सत्कार करायला माझें मन त्यावेळीं उमललें नव्हतें. तारकांचीं निःशब्द चमचमच मला माझ्याशीं समरस वाटे. त्या मंद उजेडांत भोंवतालचीं झाडेंझुडपें, सबंध धरणीच कसल्या तरी अतर्क्य उत्कंठेनें स्तब्ध झाल्यासारखी वाटते.

मी कितीतरी वेळ गुंगत पुढेंपुढें चाललों होतों. हळूंहळूं दुरून एका डफाचा आवाज माझ्या कानावर आला. आणखी पुढें गेल्यावर, त्यांत

एकतारीच्या आवाजाची जोड ऐकूं आली व त्या निनादाच्या सांथींत चार पुरभय्ये देहभान विसरून आपले हिंदी दोहे गातांना दिसले. एका लहानशा झोंपडीच्या अंगणांत त्यांची बैठक बसली होती.

त्यांच्या गाण्यांत माधुर्य नव्हतें, पण त्यांच्या तल्लीनतेनें त्यांत जीव ओतला होता. जवळजवळ नकळत पडणाऱ्या डफाच्या ठेक्यामुळे त्याकडे चित्त ओढलें जाई व एकतारीच्या सुराच्या एकचएकपणांत तें गुंतून राही.

मी बराच वेळ एका झाडाला टेंकून अंधारांत त्या झोंपडीजवळ उभा राहिलों. तों दोहा संपला व त्यांची बैठक मोडली. त्यांतला एक पोरगेलासा उठून उभा राहिला व म्हणाला, "अब जाता हूं भाई." तो आमचा भय्या होता.

तो अगदीं शांत दिसत होता. दोह्याच्या तन्मयतेंत त्याचा जीव जणूं सर्व संसारापासून विलग होऊन खूप उंचावरून सृष्टीवर नजर फेंकून आला होता. व्यक्तिनिष्ठ आकांक्षांचें मूल्य त्याला कळून चुकलें होतें. त्याने हंसत-हंसत सर्वांना रामराम केला व तो चालूं लागला.

* * * *

माझी परीक्षा जवळ आली होती, म्हणून आतांशा रोज सकाळीं मी २–२॥ तास अभ्यास करून मगच एकदम खालीं येत असें. त्याप्रमाणेंच दुसऱ्या दिवशीं ७–७॥ वाजतां मी खालीं आलों, तों भय्या आपल्या रोजच्या व्यवसायांत नव्हता. सकाळीं उशीरा उठल्यावरून त्याची व वहिनींची चकमक उडाली होती. तो नेहमीचाच विषय होता. भय्यानें आमच्या घरच्या सर्व गोष्टी उचलल्या होत्या; पण पहांटे उठणें त्याला कांहीं केल्या जमलें नाहीं. त्यामुळें दादा–वहिनींच्या चहाला नेहमीं उशीर होई. आणि विशेष वैतागाची गोष्ट म्हणजे, त्याचें त्याला कांहीं वाटतें असें दिसायचें नाहीं. त्याचा शांतपणा, त्याचें हंसतमुख कायमच. अनुतापाची छटाही कोठें दिसायची नाहीं. त्यामुळें वहिनींचा पारा साहजिकच चढे.

आज त्यांतलाच प्रकार झाला होता. मला त्या रात्रीची आठवण झाली

व भय्याला उठायला उशीर होण्याचें कारण मी ताडलें. पण तें कारण पुढें आलें असतें, तरी आमच्या गृहचक्राच्या सांच्यांत तें थोडेंच बसणार होतें ? त्या जाग्रणांत भय्याचा आनंद सांठवला होता. एवढेंच नव्हे, त्याच्या मनः-स्वातंत्र्याचें तें मूळ होतें. पण त्या गृहचक्राच्या निरुद्ध गतीपुढें अर्थातच कशाची किंमत नव्हती. मागल्या ओसरींत भय्या आपलें सामान, अंथरुण आवरीत होता. त्याला रजा मिळाली होती. चहाचा पेला पुढें घेऊन काकी जवळच बसल्या होत्या. मीही जरा वेळ उभा राहिलों.

“ कुठें जाणार तूं आज ? ” काकींनीं त्याला विचारलें.

“ पाहीन ! ” भय्या म्हणाला. “ घरांमागून घर—चाललंच आहे, काकीबाई. ”

त्याचा हा क्रम किती तरी दिवसांपासून चालू होता. पण स्थैर्याची संवय झालेल्या काकींना कसेंसेंच झाले. आपल्या अंगणापलीकडल्या जगाचा विचार आला, कीं त्या गोंधळून जात. कां, आपल्या थांबल्या जीवनांत नाविन्य आणणारा रामचरण चालला म्हणून त्यांना वाईट वाटलें ? त्यांचे डोळे भरून आले खरे. रामचरणनें त्यांना लवून नमस्कार केला व तो चालूं लागला, तरी त्या कांहींच बोलल्या नाहींत.

मार्च १९३३

---

*

# कला आणि कलावती

गजानन भास्कर कुळकर्णी, विद्यार्थी, वर्ष ३ रें, स्कूल ऑफ आर्ट, ही व्यक्ति संध्याकाळीं सहाच्या सुमारास त्या शांत रस्त्यानें झपझप चालली होती. त्याच्या अंगांत एक मळखाऊ शाईवजा रंगाचा कोट होता. सर्व बटनें उघडीं असल्यामुळें गजाननाच्या गतीनें कोटाचीं दोन्हीं टोकें पाठीमागें पळूं पहात होतीं. धोतर मळकेंसेंच, कांचा मारलेलें. नेसण्याची प्रत्येक रेषा जणू धांदरटपणाची, अस्थिरतेची साक्ष देत होती. पायांत काळ्या पेटंट लेदरच्या चकचकीत सपाता होत्या. घाईघाईत ओढल्या जाणाऱ्या पायांबरोबर मोठमोठ्यानें फट्फट् करीत, खरडत त्या कसाबसा प्रवास करीत होत्या. गजाननाच्या हातांत एक छापील खादीची पिशवी होती. तींत कांहीं जाड कागदांचीं भेंडोळीं असावीं. डोक्यावर एक उंचशी, कडकडीत काळी टोपी होती. त्याची भिरभिरती नजर रस्त्याच्या आसपासची घरें न्याहाळीत होती. कांहींतरी चावायला शोधणाऱ्या कुत्र्याच्या पिलाच्या अस्वस्थतेनें तो इकडे तिकडे मान फिरवीत होता. जवळच त्याला एक लहानसें दुमजली घर दिसलें, व त्याच्या अनुरोधानें त्यानें आपली गति व त्याबरोबर सपातांची फट्फट् आणखी वाढविली.

गजानन ज्याच्या अनुरोधानें निघाला तें दुमजली घर अगदींच लहानसें होतें. त्याचा तळमजला इतका लहान होता कीं, त्यावरची माडी अनाठायींच वाटे व माडीची ती एकच एक खोलीहि बहुतांशीं दारें व खिडक्या यांनींच बनवलेली होती. जणूं रात्रीच्या वेळीं थोड्या तरी उंच जागीं जाऊन शक्य तितक्या अनिरुद्ध व चैतन्यपूर्ण वाऱ्याच्या झोंतांत स्वतःला फेकून देतां यावें, बिछान्यावर पडल्यापडल्या चांदण्यांनी विखुरलेल्या आकाशाचा शक्य तितका मोठा भाग दृष्टिपथांत यावा, या इच्छेनेच मालकानें ती योजना केली होती. घराभोंवतीं लहानसेंच आवार होतें. पण त्याच्या एका कोपऱ्यांत एक पारिजातकाचें झाड वहरून आलें होतें. पलीकडे एक नुकताच बहर संपून पुनः नुसत्या हिरव्या रंगांत लपून गेलेला जुईचा मांडव होता. आवाराच्या भोंवतालीं, थोडथोड्या अंतरावर मोगऱ्याचीं लहान लहान झाडें होतीं. त्यांची जुनीं पानें सर्व तोडून टाकलेलीं होतीं. नीट कापलेल्या मोकळ्या फांद्यांवर मधून मधून लुसलुशीत कोवळीं पानें दिसत होतीं. मोगऱ्यांचा सारा जीव उन्हाळ्यांत येणाऱ्या बहराची तयारी करण्यांत गुंतून गेला होता.

पारिजातकाच्या जवळच सडा टाकून स्वच्छ केलेल्या जागेंत एक लांकडी तक्तपोस पडला होता. वर सतरंजी व पूर्वेकडील बाजूस एक लोड होता. त्या लोडाशी टेकून त्या घराचा मालक व एकच एक रहिवाशी बसला होता.

त्यांना आसपासचे लोक 'मास्तर' याच नांवानें ओळखत. गेलीं १५ वर्षे ते तिथल्या मिड्लस्कुलांत शिक्षकाचें काम करीत होते. त्या धंद्यांत एकदां पाय रुजला कीं, आयुष्यांत बदल, गडबड, खेचाखेंच कुठली उत्पन्न होणार? जसे एकावर एक अकरा रुग्ळ मोजायचें तसेच दिवसामागून दिवस यायचे. व मास्तरांची वृत्तीहि अशी शांत व सरळ होती कीं, ते जरी दुसऱ्या कुठल्या खेंचाखेंचीच्या धंद्यांत पडले असते तरी त्यांचे दिवस एकावर एक अकराच्या ठराविक शांततेंतच उगवले असते व मावळले असते.

परंतु त्यांचें आंतरिक जीवन मात्र भावनामय आंदोलनांनीं व्यापलेलें

होतें. आठवड्यांतून कधींकाळीं सकाळी भाजीपाला आणायला म्हणून गेले तरी त्यांच्या भावनामय विचारांची खालवर सुरू व्हावयाची. आपल्या तीक्ष्ण पण प्रेमळ दृष्टीनें ते जणूं समोर येणाऱ्या प्रत्येक दृश्याचें अंतरंग शोधून पहात. कित्येक चेहरे आपल्या व्यक्तिगत वैशिष्ट्यानें त्यांच्या स्मृतीवर कायमचे कोरले जात. कित्येक मुद्रा आपल्या निःशब्द वाणीनें त्यांना जणुं आपल्या सबंध जीवनाची कहाणी सांगत; त्यांच्या अंतःकरणाला जाऊन भिडत.

काम आटोपून आल्यावर मास्तर हातपाय धुवून, संध्याकाळच्या वाऱ्या-इतक्याच संथ व स्वच्छ मनानें आपल्या तक्तपोसावर बसत. त्यावेळी दिवस-भरांत डोळ्यांपुढून गेलेली चित्रें जणूं नव्यानें त्यांच्या मानसचक्षूंना दिसूं लागत. त्यांच्या मनांत जीवनांत दिसून येणाऱ्या वेगवेगळ्या वृत्तीचें महत्व-मापन सुरू होई. या त्यांच्या उमाळ्यांना कित्येकदां मूर्त स्वरूपहि मिळे, व तें म्हणजे त्यांच्या चित्रकलेच्या द्वारें.

शांततेच्या शिवाय त्यांना कशाचें वेड असेल तर चित्रकलेचें. एखादें चित्र हातीं घेतलें कीं, त्यांतील रेषांचें संगीत जुळवण्यांत, त्यांतील रंगाचें मीलन घडवण्यांत ते जणूं आपला जीव ओतीत. ते तासचे तास त्याच्याकडे पहात बसत. त्यावेळीं त्यांचा हात स्वस्थ असे. पण मन रंगामागून रंगाची निवड करण्यांत गुंग झालेलें असे—उमटलेल्या रंगारेपाची आंतील हेतूशीं, जिव्हाळ्यांशीं जुळणी करण्यांत गढून गेलेलें असे.

याहूनहि गाढ आनंदसमाधि मास्तरांची कधीं कधीं लागे. ती म्हणजे त्यांच्या आवडत्या चित्रकारांच्या कृतीशीं तन्मय होतांना. त्या कृतीकडे पहातां पहातां ज्या भावनेंतून, ज्या सौंदर्यदृष्टीच्या विशालतेंतून त्यांचा जन्म झाला होता, त्याच विशालतेंत मास्तरांचें मन जणूं विलीन होई. व परमात्मस्वरूपीं विलीन झालेल्या आत्म्याच्या ब्रह्मानंदांत ते पोहूं लागत. अत्यंत जुन्या अशा नटराजाच्या मूर्तीतल्या चैतन्याचा आस्वाद घेतांना

किंवा नंदलाल बोसांच्या सतीसाठीं शोक करणाऱ्या महादेवाच्या दृष्टींत दृष्टी मिळवितांना त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागत.

या उच्च कलाकृतींनीच मास्तरांना त्यांच्या स्वतःच्या कलेचे धडे दिले होते. मास्तर कधींही कुठल्या आर्टस्कुलांत गेले नव्हते. स्वतःच्या आवडींत, विचारांत व जिव्हाळ्यांतच त्यांच्या कलेचा उगम व विकास झाला होता.

त्यांच्या कलेवरच्या प्रेमांत त्यांच्या जीवनसौंदर्याचा झरा होता. त्यानेंच त्याना शांति दिली होती. त्यानेंच त्यांची सहानुभूति विकासली होती. त्यांना इतरांच्या अंतःकरणाचा ठाव घेणारी दृष्टी दिली होती. आपलें उगमस्थान ओलांडून पुढें पुढें जाणें हा झऱ्याचा धर्मच. थंड, निर्मळ पाणी दिसलें की त्याचा आस्वाद घेणें हा मानवतेचा धर्म. त्यामुळेंच मास्त-राची कला व मास्तरांचें जीवनसौंदर्य त्यांच्या उंबरठ्यांच्या मर्यादेंत राहूं शकलीं नाहींत. मास्तरांनी स्वत. त्यांना राजद्वारीं किंवा लोकद्वारीं कधींच नेलें नाहीं. त्यांच्या अंगणांत उगवणाऱ्या पारिजातक–मोगऱ्यांचा सुवास त्यांच्या आवारांतच राहणें शक्य होतें का ? त्यांच्या कला–पुष्पांचा सुवासहि तसाच आपोआप दूरवर पसरून वातावरण दरवळून टाकीत होता.

नित्याप्रमाणें मास्तर आज लोडाशीं टेंकून बसले होते. आपल्या दोन्ही हातांची बोटें एकमेकांत गुंतवून डोक्याच्या पाठीमागें ठेवून ते मागेंच रेलून बसले होते. त्यांची दृष्टी पश्चिमेच्या क्षितिजावरील रंगाच्या नाचावर खिळली होती. आकाशसमुद्राच्या पैलतीराशीं जातांना सूर्य जणूं रंगीबेरंगी लाटा उधळीत होता. एक लाट उगवे, व दूरवर पसरूं लागे. तोंच दुसरी तिचा पाठलाग करीत येई व दोघींचे रंग एकमेकींत मिसळून तऱ्हतऱ्हेच्या छटा उमटत. मास्तरांनीं बघतांबघतां डोळे मिटले. त्यांच्या मानसचक्षूंना त्या सौंदर्याचें सारसर्वस्व अशी एक गोजिरवाणी मूर्ति दिसूं लागली. त्यांना वाटलें जणूं हंसरीनाचरी संध्याबाला आपलें रंगारंगाचें झुळझुळतें वस्त्र एका हातानें आवरून घरीं परत चालली आहे. जातांजातां मध्येंच तिनें मागें वळून पाहिलें. तिचे डोळे हास्यानें मिस्किलपणानें चमकले. ‘ उद्यां मी याहून सुंदर बनून येईन, ’ असेंच जणूं ती गुणगुणली.

मास्तरांनीं डोळे उघडले, तों समोरचें दृश्य पालटलें होतें. सूर्य क्षितिजाखालीं निघून गेल्यावरची अवकळा त्या सर्व रंगावर पसरली होती. समोरच्या रस्त्याकडेच्या वडाच्या पारंब्यांतून लाल क्षितिजाचा भाग उदासपणें डोकावत होता. झाडें, पानें, वरचें आकाश काळसर झालें होतें. आधींच शांत असलेला रस्ता जवळ जवळ निर्मनुष्य झाला होता.

मास्तरांच्या मनावर एकदम हुरहुरतें औदासीन्य पसरलें. त्यांच्या मानससृष्टींत नुकतीच हास्याचें तेज पसरवणारी बाला कुठच्याकुठेंच लोपून गेली. तितक्यांतच समोर रस्त्यावर त्यांना एक अंधुक आकृति दिसली. तो एक अत्यंत थकलेला म्हातारा होता. त्याच्या हातापायांच्या काड्या झाल्या होत्या. त्याच्या कमरेत वांक आला होता. तो काठी टेंकीत चालत होता. व तरीही त्याच्या डोक्यावर एक चांगला मोठा काटक्यांचा भारा होता. तो क्षणभर उभा राहिला. आपली हातांतली काठी त्यानें हलकेंच खालीं टाकली व आपल्या डोक्यावरची मोळी खाली उभी करून तिला धरून थोड्याशा विश्रांतिसाठीं तो उभा राहिला.

मास्तरांचें औदासीन्य अधिकच तीव्र झालें. ते त्या म्हाताऱ्याकडे अनिमिषपणें पाहत राहिले. त्या संधिप्रकाशांतही त्यांचे डोळे चमकूं लागले... इतक्यांत तो म्हातारा पुन्हां मोळी उचलायचा प्रयत्न करूं लागला. मास्तर अवचितपणें उठले, आवारापाशीं गेले व म्हणाले, " बुढेबावा, केवढ्याला देतां तुमची मोळी ? "

म्हाताऱ्यानें मागितलेले पैसे मास्तर चुकते करीत असतांनाच गजानन भास्कर कुळकर्णी तेथें येऊन ठेपला. तो मास्तरांच्या आवारांतील फुलांच्या सुवासानें ओढला गेला नव्हता. आतांपर्यंत दहा घरांत तो जाऊन आला होता, तसाच मास्तरांच्या अकराव्या घरांत आला. घरें न्याहाळतां न्याहाळतां त्या वडाच्या पारंब्यांमधून दिसणाऱ्या लाल क्षितिजाकडे त्याची दृष्टी वळलीहि नव्हती. मास्तरांच्या फाटकापाशीं तो आला तरी त्या म्हाताऱ्याकडे त्याचें लक्षहि गेलें नाहीं.

मास्तरांनीं त्याला आंत नेलें व तक्तपोसावर बसवलें. गजाननानें एक कागद त्यांच्यापुढें केला. तें एका वकीलाच्या सहीचें पत्रक होतें. गजाननाला शेवटच्या परीक्षेला मुंबईस जावयाचें होतें. पण गरीबीमुळें त्याला वर्गणी मागत फिरणे भाग होतें. सध्यां ५ रु. च कमी पडत होते. तरी सर्व सद्-गृहस्थांनीं त्याला मदत करावी इ. मजकूर त्या चिठ्ठींत खरडला होता. मास्तरांनीं तो कागद लक्षपूर्वक वाचला. नंतर वर मान करून गजाननाकडे निरखून पहात ते म्हणाले, " अस्सं, तुम्ही आर्ट स्कूलच्या परीक्षेला बसणार का ! "

गजाननाला किल्ली देण्याचाच अवकाश होता. तो भराभर व कांहींशा मोठ्या आवाजांतच बोलूं लागला, " होय, शेवटचें वर्ष आहे माझं. माझ्याबरोबर माझं कांहीं कामहि आहे. तें आपण पाहिलेत म्हणजे आपली खात्री पटेल. सर्व तऱ्हेचं ' वर्क ' करीत असतों मी. एन्लार्जमेंटस्, लॅन्डस्केप्स, स्टिल लाईफ, सर्वांचे नमुने आहेत माझ्याजवळ. हा हॅन्डवर्कचाच एक नमुना पहा. " असें म्हणून त्यानें मोठ्या आढ्यतेनें आपल्या पिशवींतून एका नामांकित गृहस्थाचा एन्लार्जमेंट काढला.

मास्तरांनी तो हाती घेतला व त्यांच्या चेहेऱ्यावर उघड उघड आश्चर्य प्रकटलें. ते म्हणाले,

" काय म्हणतां—हें हाताचं काम हं सारं ! "

" हो तर ! "

" अरे वा—मला वाटलं की तें एक यंत्र असतं, त्यानें एन्लार्ज करून मग भरून काढलेलं आहे. "

" वा वा, म्हणून काय झालं ? त्या यंत्रानें रेषा इतक्या पुसट येतात कीं जणूं कागदावर कांहीं नाहींच. त्यावरून इतकं सगळं करायला अत्यंत कौशल्य लागतं. " गजाननानें सावरून घ्यायचा प्रयत्न केला, व लगेच विषय बदलला. " हें पहा एक ' लॅंडस्केप. ' "

मास्तरांनी तें चित्र हाती घेतलें. त्या वाढत्या अंधारांत देखील त्याचे रंग मोजून देतां आले असते. त्यांतील आकाश गुलाबी होतें. झाडें हिरवीं-

गार होतीं. मध्यें एका महालावरून उतरणारा जिना होता. समोर कारंजें नाचत होतें.

" स्टिल लाइफ व नेचर एके ठिकाणीं घातले आहेत यांत ! " गजानन म्हणाला.

' हं '—या एका शब्दापलीकडे मास्तर कांहीं बोलले नाहींत. गजानन तिसरें चित्र दाखवूं लागला—पुढें पाणी पसरलेलें; कांठाशीं एक बाग. त्यांतील एका संगमरवरी दगडावर एक जोडपें बसलेलें. मास्तरांनीं तें हातीं घेतलें व ठेवलें. गजाननानें चवथें चित्र काढलें. मास्तर आपले कलेचे नमुने नीट पहात नाहींत, असे पाहून गजानन म्हणाला, " तुम्हांला कदाचित् आतां नीट दिसत नसेल. दिवा आणल्यास बरं पडेल. हें श्रीकृष्ण परमात्म्याचं चित्र आहे. या चित्राचा आमच्या क्लासांत पहिला नंबर लागला होता. "

" असं कां ! मला दिसतंय नीट. पाहूं ! " मास्तरांनीं तें चित्र घेतलें.

श्रीकृष्ण परमात्म्याचें चित्र ! मास्तरांनी नीट पाहिलें. डोक्यावर मुकुट, गळ्यांत रंगीबेरंगी रत्नांचे हार घालून आभाळाकडे नजर लावलेला एक मारवाडी मुलगा मास्तरांना दिसला. ते हळूंच म्हणाले, " जय श्रीकृष्ण परमात्मा ! "

गजानन खूष झाला. त्याला वाटलें हें तरी चित्र या म्हाताऱ्याला उमगलें. पण तो त्याचा आनंद क्षणभरच टिकला. मास्तर निराशापूर्ण आवाजांत विचारूं लागले,

" हं, तुम्ही पुढें काय करणार आहांत चित्रकार झाल्यावर ? "

पुरा चित्रकार झाल्यावर काय करायचें हा प्रश्न कशाला, गजाननाला वाटलें. हा म्हातारा जरा चमत्कारिकच आहे, असा त्याचा प्रथमपासूनच ग्रह झाला होता. तो आतां बळावला. तो जरा त्रासिकपणें म्हणाला, " पुढें काय करणार ? अर्थातच चित्रकलेला वाहून घेणार ! माझं एन्लार्जमेंटमधलं कौशल्य कित्येकांनीं वाखाणलं आहे. धंद्याला सुरवात केल्यावर एकदोन वर्षांतच माझा चांगला जम बसेल याची खात्री आहे. कित्येक मोठ्या लोकांनीं मला आतांपासून काम देण्याचं कबूलही केलं आहे......त्यानंतर

मग मी एक क्लासहि कढायचा बेत केला आहे. हो, आपण ज्यांच्याजवळून इतकं सुंदर काम शिकलों त्यांच्या उपकाराची फेड करायचा उत्तम मार्ग म्हणजे इतरांना त्या कलेचं दान करणं हाच, असं खऱ्या कलावंताला वाटतं...'' गजाननाचा आवाज पुन्हां वर चढला होता.

मास्तर कुठेंतरी पहात होते. त्यांची चर्या कसल्यातरी चमत्कारिक काळजीनें व्यापृत झाली होती. गजाननाच्या व त्याच्या शिष्यांच्या त्या तऱ्हेच्या कलाकृतींनीं आकाश जणूं भरून गेलेलें त्यांना दिसत होतें. अस्वस्थतेनें त्यांचे चित्त व्याकुळ होऊं लागलें. पण त्यांचा भिडस्त, विनयशील स्वभाव त्यांना गजाननाशीं स्पष्टपणें बोलूं देईना. ते अडखळत गजाननला म्हणाले, '' तुम्हांला खरंच वाटतं कलेचं दान करतां येत म्हणून ? मोठ्या लोकांची एन्लार्जमेंटस् केलीं की तुम्हाला खरंच समाधान मिळतं...? ''

हे प्रश्नदेखील गजाननाच्या बुद्धीच्या आवांक्याबाहेरचे होते. त्याच्या तीन वर्षांच्या शिक्षणात त्यानें कलेचें समाधान हा शब्दहि ऐकला नव्हता. तो मास्तरांकडे नुसता पहात राहिला.

मास्तर क्षणभर स्तब्ध उभे राहिले व मग मोठ्या कष्टानें म्हणाले, ''मला किनई-खरोखर अशीं चित्रं आवडत नाहींत. तुम्ही मजजवळ वाटेल तें मागा. परंतु या अभ्यासासाठीं पैसे मागूं नका....''

गजाननला कांहींच उलगडेना. पण आपला कार्यभाग साधत नाहीं हें त्याला स्पष्टपणें कळून चुकलें. त्यानें आपले रंगीत कागद गोळा केले व तो चालूं लागला.

मास्तर कितीतरी वेळ त्याच्याकडे पहात होते. त्यांना जणूं एका गजाननाच्या ऐवजीं आर्ट स्कुलमधील विद्यार्थ्यांची ओळच ओळ भेंडोळी घेऊन जातांना दिसत होती. कांहीं वेळानें त्यांनीं मान वळवली व समोरच्या वडाच्या पारंब्यांकडे पाहिलें. त्यांच्यामधून दिसणारा रक्तिमा केव्हांच नाहीसा झाला होता. पश्चिम क्षितिजावर पूर्ण काळोख पसरला होता.

एप्रिल १९३५

---

# मृगाचा पाऊस

चार दिवसांपासून दुपारचे ढग येत. खूप अंधारी येई. पण लवकरच सोसाट्याचा वारा सुटे व पावसाचें सर्व अवसान कुठल्याकुठें निवून जाई. तिनें दोन दिवस वाट पाहिली. तिसऱ्या दिवशींही तोच प्रकार. घरांतला दाणादुणा संपत आला. उद्यांला खायला कांही नव्हतें, म्हणून ती जिवाचा धडा करून बाजाराकडे निघालीच.

झोंपडीच्या छपराच्या एका झरोक्यांतून मधून मधून उजेडाची एक तिरीप येई. तिच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहात तिचा तान्हा कितीतरी वेळ पडून राही. नेहमींप्रमाणे तिनें त्याला टोपलींत घालून त्या ठिकाणीं ठेवला. त्याच्या भोंवतीं गुंडाळलेलें फडकें आणखी नीटनीटकें केलें व ती बाहेर पडली. तिनें झोंपडीला कडी घातली व एकवार घराच्या भोंवतालीं नजर फेंकून ती झपाझप निघाली. तिनें पोराला एकटें टाकलें, पण वादळ झालें तर त्याच्या अंगावर घालण्याइतका तिचा पदर तरी कुठें धड होता?

बाजार गच्च भरला होता. वादळाच्या भीतीनें सर्वांची एकच धडपड चालली होती. आपल्याजवळ छत्री आहे, आपण टांग्यांतून जाऊं—ही चार पैशाचा दाणा घेणारी दुष्काळांतलीं भुतें कशाच्या आसऱ्याला उभीं

राहतील, असा विचार कोणाच्या मनांत येणार? एकच धांदल व एकच कोलाहल उडून गेला होता. तशांत रोजचा वारा सुटला. पण तो आज एकटाच आला नाहीं. पश्चिमेच्या बाजूला पसरलेल्या प्रचंड काळ्याकुट्ट मेघांच्या बाजूने तो आला व त्याची साक्ष म्हणून त्याच्याबरोबर तडातड् मारणारे टपोरे थेंबही आले.

पांच मिनिटांत सर्व जलमय होऊन गेलें. मग पहिले अवसान ओसरलें. पण उघाडीचा प्रश्नच नव्हता. पाऊस पडतच राहिला. दोन अडीच महिने जिवाचे रान करून धरणीनें वाट पाहिली. पर्जन्यरायानें पहिलीच भेट इतक्या अलोट प्रेमाने दिली. त्यामुळें तिचें मुख प्रसन्नतेनें खुलून गेलें. झाडांना टवटवी आली, घरें छपरें स्वच्छ धुवून निघाली. रस्त्याच्या बाजूंनीं लहान लहान ओहळ धावूं लागले. मुले बाळे 'पाऊस-पाऊस' करीत आपल्या ओसऱ्यांतून, खिडक्यांतून गंमत पहात उभी राहिली. मोठ्यांचीही कविहृदयें पावसाच्या त्या प्रसन्न, उदात्त दृश्याने फुलून गेलीं; पाण्याच्या निनादांत तन्मय होऊन गेलीं.

पण ती? ती कुठें होती? तिचा बाजार झाला का? वादळाचा पहिला थेंब अंगावर पडतांच ती त्या सरीइतक्याच वेगानें धांवत निघाली. तिचें छपडें त्या झरोक्याखालीं होतें ना? एवढ्या प्रचंड झंझावातानें एकादें कौल उडवून दिलें तर? कुठेंतरी थोडेंसें छिद्र सांपडलें कीं तिथे भगदाड पाडणें हें त्या राक्षसी वादळाचें कामच. तिला वाटूं लागलें, एकादें कौल ढांसळलें तर बाळाच्या अंगावर पडायचें. तो रडूं नये म्हणून केवढा मूर्खपणा केला मी?

तिला घर किती दूर वाटूं लागलें! जातांना तिला वेळेची जाणीवही झाली नव्हती. आतां तिच्या पायाखालची वाट सरेना. त्यांतच रस्त्यावर पाणी सांचलेलें. 'माझा बाळ निजला असेल का? झरोक्यांतून गळणाऱ्या पाण्याने भिजला तर पडसें येईल त्याला.'

ती विचार करीत होती का चालत होती—रस्त्यावर होती का झोंपडींत बाळापाशीं होती, हें तिलाच कळत नव्हतें. यंत्राप्रमाणें तिचे पाय रस्त्या-

वरचें पाणी तुडवीत धांवत होते. डोक्यावरचा पदर भिजून चिंब झाला. गालांवर केंसावरचे ओघळ वाहूं लागले. पाठीवर सारखा पावसाचा मारा बसत होता. झप्झप् पावलांनी उडणाऱ्या चिखलांनीं पोटऱ्या, पाठीकडलें लुगडें भरून गेलें.

दुरून तिला झोंपडी दिसली. दार लागलेलेंच होतें. बाहेरून तर सर्व व्यवस्थित होतें. जवळपासचे वृक्ष डोलून डोलून थकले होते. पण एकदा गति मिळाल्यावर त्यांच्या लहान फांद्या व पानें अजून नाचतच होती. त्यांचा तो हिरवा नाच तिच्या बाळाला किती आवडे !

तिनें दार उघडलें. झोंपडींत उजेड जास्त झाला होता. एक कौल पडलें होतें. पण तें पलीकडे. बाळापासून दूर चार हातावर त्याचे तुकडे तुकडे झाले होते. तिचा जीव खालीं पडला. " निजलं आहे गुणाचं," असें म्हणून ती चट्दिशीं जवळ गेली. झरोक्यांतून येणाऱ्या पाण्यानें बाळाची टोपली ओली चिंब झाली होती. गारठ्यानें मुठी घट्ट आवळून, खूप रडल्या-नंतर थकून तो पडला होता. तिनें त्याला चटकन् उचलून पोटाशीं धरले व ती खालीं बसली. किती उत्सुकतेनें तो तिच्या उबेंत शिरला ! तिच्या डोळ्यांतूनही आनंदाच्या मृगधारा सुरू झाल्या.

जून १९३१

---

# सीताराम

सीता जात्याच फार कुढ्या व आत्मनिष्ठ स्वभावाची. तशांत तिच्या व रामजीच्या वयांत १०–१५ वर्षांचें अंतर. त्याच्याबरोबर तिचा जो काय पांचसहा वर्षे संसार झाला तो सुखासमाधानाचाच झाला. परंतु त्या अवधींत तिला स्वतःखेरीज कुणाचा विचारही करायची कधीं पाळी आली नाहीं. रामजीनेंच तिची हौस पुरवावी, तिचें कौतुक करावें व तिच्यासारखी चुणचुणीत व नीटस बायको मिळाल्याबद्दल स्वतःला धन्य समजावें. आणि नाहीतरी, चांगल्या सुखवस्तु मळेवाल्याची दुसरी बायको झाल्यावर सीतेनें तरी स्वयंपूर्ण बनूं नये तर काय करावें? लहानपणच्या बालिश आत्मनिष्ठेतून बाहेर पडते तोंच ती रामजीच्या सुखाची स्वामिनी व त्याच्या मळ्याची मालकीण बनली. त्यामुळें तिचें मन स्वतःच्या आकुंचित जाणीवेच्या बाहेर कधींच गेलें नाहीं. कुठल्याही आत्यंतिक भावनेनें उचंबळून येऊन परिस्थितीच्या किंवा जगरहाटीच्या सापेक्षतेनें स्वतःविषयीं विचार करण्याची तिच्यावर पाळी आलीच नाहीं. बरोबरीच्या बायकांशींही तिचें बोलणें जितक्यास तितकेंच असावयाचें. त्यामुळें मनाच्या परिपक्वतेचा ह्याही मार्ग तिला बंदच होता.

रामजीचा मळा गांवाबाहेर बराच दूर होता. तिथेंच एका कडेला त्याचें लहानसें झोंपडीवजा घर होतें. फळाफुलांच्या शुश्रूषेसाठीं त्याला तिथें रहाणें भाग होतें. सीताही पिढीजाद माळ्याची पोर. तिला देखील आपल्या मळ्यांतल्या मोटेच्या पाटांची आणि फुलत्या झाडांचीच संगत बरी वाटे. परंतु तिच्या जगाची ही स्वयंपूर्णता फार दिवस टिकायची नव्हती. एक दिवस अचानकपणेंच दैवाने रामजीला भरल्या संसारांतून उठवलें. व त्याचा तो टुमदार मळा लागवडीच्या पैशाच्या फेडीसाठीं तीन वर्षे सावकाराकडे गेला. सीता निराधार झाली. तिचें रहातें घर तिच्या डोक्यावर राहिलें. पण पोटापाण्यासाठीं तरी बाहेरच्या जगाकडे धांव घेणें तिला प्राप्त झाले.

रहातें घर तरी काय—गांवापासून किती दूर. गांवांतल्या सर्व वडील माणसांनीं तिला तें सोडून वस्तींतल्या एकाद्या लहानशा भाड्याच्या घरांत यायचा परोपरीनें उपदेश केला. रात्रीच्या वेळी कुठें कांहीं चोर–जनावर आलें आणि ती ओरडली तर कानोसा घ्यायला देखील कुणी आसपास नव्हतें. तशांत घरालगत ती मळ्याचीं दाट झाडेंझुडपें आणि आंत अचानकपणें रामजीचा प्राण गेलेला. साधारण गांवकऱ्याला तर तिथें चैन पडणें अशक्यच वाटे.

पण सीतेला तें घर सोडणेच कठीण वाटूं लागलें. एकतर कामधंद्यासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणें, परक्यांची मर्जी राखणें, हेंच तिच्यावर कोण संकट आलें होतें. तशांत ती मूक सृष्टी सोडून दिवसाच्या कांठींही जातवाल्यांच्या वुजवुजाटांत येऊन पडणें, हेंच तिला असह्य वाटूं लागलें. कांहीं अंशी रामजीच्या आठवणीमुळें ती जागा प्रिय झालेली म्हणून, कांहीं अंशीं स्वतःच्या एकलकोंड्या स्वभावामुळें सीतेनें तिथेंच दिवस काढायचा ठाम निश्चय केला. इतकेंच काय, पण आपल्या बरोबरीच्या, आपल्या जातीच्या माणसांशीं फारसा संबंध नको, म्हणूनच कीं काय, तिनें कोणाही कास्तकाराच्या शेतांवर काम धरलें नाहीं. मळ्याच्या दुसऱ्या बाजूला एक साधारण श्रीमंत वस्ती होती. तिथल्या बंगल्यांवर ती कधीं कधीं ताजी भाजी,

फळें विकायला जात असे. आपल्या लोकांपेक्षां या मोठ्या माणसांशीं संबंध पुरवला; व्यवहारांत कटकट नाहीं, असें रामजी तिला नेहमीं म्हणे. त्या निमित्तानें तिची त्या वस्तींत ओळखही झाली होती. तिथल्याच कोणत्यातरी बंगल्यावर धुणें-भांडीं, झाडलोट करावी, दिवसभर तिथेंच घालवावा व सांजेच्या प्रहरीं झोंपडीवर आलें कीं भाकरी खाऊन निजून जावें, हाच तिचा नित्याचा क्रम बनला.

याच जीवनक्रमाची सीतेला संवयही पडली. तरी गांवकऱ्यांना तिच्या हेकेखोरपणाचें आश्चर्य वाटणें कमी झालें नाही. बाया-बापड्यांनीं म्हणावे, " कशी व माय पोर ! त्या किर्रर रानांत एकली राह्यते रातची..." संभावित गांवकऱ्यानीं चार दिवस सीतेलाच त्याबद्दल म्हटलें, आठ दिवस आपापसांत चर्चा केली व पुढें मनातच आश्चर्य मानलें. पण आणखी एक तिसरा गट राहिलाच. तो म्हणजे गांवच्या गुंडांचा. सीतेसारख्या तरण्याताठ्या बाईनें एकटे राहण्याची हिमत बांधावी, हा खरोखरी त्यांच्या पौरुषाचा अपमानच होता. त्यांनी आपले आश्चर्य तिच्या मळ्याभोंवतीं वेळी-अवेळीं हिंडण्यांत व्यक्त केलें रामजीच्या मृत्यूनंतर थोड्याच दिवसांनीं म्हादवा नांवाच्या त्यांच्या एका म्होरक्यानें अपरोक्ष रीतीनें सीतेशी पाटाचें बोलणें करण्याचा प्रयत्न केला. ती मागणी सीतेनें नाकारल्याचीही त्यांत भर पडली. मग कांहीं दिवस निदान रात्रीच्या पहिल्या प्रहरीं तरी तिच्या मळ्यालगत कुठे तरी मैफल जमवून अचकट विचकट गाणी म्हणण्याशिवाय म्हादबाच्या कंपूला उद्योगच उरला नाहीं.

संभावितांना हा प्रकार ऐकून आणखीच आश्चर्य वाटे. पण सीतेच्या मनाभोंवतीं तिच्या हेकेखोरपणाचें व अनुभवाच्या अभावाचें जणुं कवचच निर्माण झालें होतें. दिवेलागणीच्या आंत घरी येऊन तिनें पुढल्या दाराला कडी घातली कीं तिला एकाद्या किल्ल्यांत बसल्याइतकें सुरक्षित वाटे. व तिचा थकलाभागला जीव कधीकधीं म्हादबाचें सैतानी संगीत सुरू व्हायच्या आधींच झोंपेंत पूर्णपणें विलीन होई.

*　　　*　　　*

नाहीं म्हणायला तिची एकच लहानपणापासूनची सखूबहिण होती. सारजीचें वस्तींत चांगलें चार खणांचें घर होतें. तें पोरांबाळांनीं गजबजलें होतें, धान्यानें समृद्ध होतें. तिला जीवनांत सगळीकडेच आबादीआबाद दिसे, व तिच्या चेहेऱ्यावर त्या समाधानाचें स्मित नेहमीं विलसत असे. पण सीतेची आठवण झाली कीं तिच्या काळजांत चमक उठे. तिनें घेतलेलें अकालीं वैराग्य पाहून तिचा जीव कळवळे. तिला नेहमीं वाटे, सीतेनें पाट लावावा. आधींच्या मुलांची अडचण नाहीं. तरणीताठी, नाकीं–डोळीं नीटस. तिला काय कठीण जाणार होतें एकादा कर्ता, मिळवता नवरा मिळायला ! सीतेजवळ तिनें एकदोन वेळां तशी गोष्ट काढलीही. पण त्याचा परिणाम मात्र वेगळाच झाला. सीतेनें तिच्याशींदेखील तुटकपणें वागायला सुरवात केली. कां कोण जाणें, संसारावरून तिचें मन पार उडालें होतें. सारजीला तिच्या करारीपणाची चांगली जाणीव होती. तिनेंही चाणाक्षपणें तो विषय सोडला पण सीतेकडे एक खेप टाकल्याशिवाय कांहीं तिचे चार दिवस जात नसत. कधीं आपल्या हातची चटणी घेऊन, कधी स्वतःच्या मळ्यावरची ताजी भाजी घेऊन, सीता कामावरून यायच्यावेळीं ती तिच्या दाराशीं हजर होई.

या एकलकोंड्या जीवनाचा परिणाम मात्र सीतेवर बराच झाला. सदैव तुटकपणें वागण्यानें, सदैव सावधगिरी राखण्यानें, तिच्या स्वभावांतील पूर्वीचें सुखाच्या काळचें थोडेंबहुत मार्दव पार लोपून गेलें. तिच्या चेहेऱ्या-वरील रेषांपासून तों तिच्या वाणीपर्यंत तिच्या वागणुकींत एक प्रकारची आत्यंतिक तीव्रता भरूं लागली. कोणी कांहीं एवढेंसें म्हटलें कीं, कधीं कधीं तिच्या न कळतही तिच्या तोंडून फटदिशीं उत्तर निघून जाई. मग ती बोल-णारी व्यक्ति कुचेष्टेखोर असो वा सहज, चांगल्या भावानें कांहीं सुचवणारी असो. तिच्या मोहल्ल्यांतील सर्व लोक तिला लवकरच हेकड समजूं लागले, व या वाणीच्या तीव्रतेनेंच तिचीं किती तरी चांगलीं घरें सुटलीं होतीं.

आजही ती त्याच अवस्थेंत होती. दोन तीन दिवस तिनें घरीं बसूनच

काढले, धुण्याभांड्याचा तिला मनस्वी कंटाळा आला होता. तसें पाहिलें तर दोन तीन महिने देखील अंगावर काढण्याइतकी पुंजी तिच्याजवळ जमली होती. पण स्वस्थ बसून तरी काय करणार ! दोन दिवसच तिचा वेळ जातां जाईना. पुढें काय करावें, या विचारांतच ती एक दिवस सकाळीं दारापाशीं बसली असतांना तिकडून म्हादबाच्या शेतावर कपाशीचें निंदण करायला जाणाऱ्या दोनतीन बायका आल्या, व सहज म्हणाल्या, " चालतां का शिताबाई–लई काम हाये शेतावर. " सीतेनें त्या कोणाच्या शेतावर जातात याची चवकशी केली. म्हादबाचें नांव ऐकतांच तिच्या मनानें माघार घेतली. त्याच्या अचकटपणाचा इतका अनुभव आला असतांना, त्याच्या शेतावर जाऊन त्याचाच आसरा घेतल्यासारखें कशाला करावयाचें?—पण घरीं बसून तरी काय करायचें? इतक्या बायका काम करणार, त्यांतलीच एक म्हणून जावें झालें, असें ठरवून शेवटीं ती म्हणाली, " ही चालत्ये पगा—वांईच बसून तरी काय करूं? "

परंतु शेतावर जातांच जें नको तेंच पुढें आलें. तिच्या बरोबरच्या बायका सरळ म्हादबाच्या रखवालीच्या जागेवरूनच गेल्या. व त्यांतली एक त्याला म्हणाली, " आज आणीक योक आनली पगा..."

म्हादबानें सीतेकडे पाहिलें, क्षणमात्र त्याच्या रांकट चेहेऱ्यावर आश्चर्य चमकलें; पण लगेच कांहीतरी दुसरा विचार आला व त्यानें अगदी कांहीच झालें नाही असा आविर्भाव आणून म्हटलें, " कां शिताबाई, बंगल्यावरलं काम सुटलं व्हय? "

सीतेनें सरळ पद्दातच ' हो ' म्हटलें व ती बरोबरच्या बायांमागें चालूं लागली; शेतांत जाऊन त्यांच्याजवळचीच एक रोपांची ओळ तिनें धरली व ती निंदण करूं लागली.

किती तरी वेळ तिच्या जिवाला चैन पडेना. आपण भलत्याच ठिकाणीं तर आलों नाहीं, हा विचार तिला कांहीं सुचूं देईना. आतां निसटावें कसें, हेंही

तिला कळेना. तिच्या बरोबरच्या बायका कामाला लागून त्यांची टकळीही केव्हांच सुरू झाली होती.

सीतेनें हळूंहळूं भोंवती नजर फिरविली. नुकतीच कुठें वाऱ्यानें हलूं डोलूं लागण्याएवढीं झालेलीं तीं कपाशीची रोपें पाहून तिला नकळत आल्हाद वाटूं लागला. त्यांतून ती सकाळची प्रसन्न वेळ. तिलाच जणूं काय वाचा फुटून, शेतांतून ठिकठिकाणाहून त्या कामवाल्या बायकांच्या पुंजक्यांतून कुठून नुसता गप्पांचा किलबिलाट, तर कुठून गळ्यांत गळा मिळविलेला गाण्याचा स्वर ऐकूं येई. तिनें आणखी दूरवर, मागे वळूनही, नजर फिरवली. म्हादबाचा तिला कुठें मागमूसही दिसेना. तो कुठें तरी दुसऱ्या कामाला निघून गेला असावा. तिचा जीव खालीं पडला. तिला वाटलें, " आता त्याचा आपला काय संबंध येणार ? पैशाच्या वेळी बरोबरच्या कोणा तरी बाईला ते घ्यायला सागावें म्हणजे झालें..." तीही आपल्या घोळक्याच्या किलबिलाटांत सामील झाली.

दोन तीन दिवस तिचें काम सुरळीतपणें चाललें. सकाळी म्हादबा शेतांत जायच्या रस्त्यावरच बसलेला असे, यापलीकडे त्याचा तिच्याशी तोंपर्यंत तरी कांहीं संबंध आला नाहीं. प्रसन्न, मोकळ्या वातावरणांत, चार बायकांत खेळीमेळीनें काम करून सीतेचें मनही पुनः उमलूं लागलें होतें. पण तिच्या शरिराला उन्हांतान्हांत काम करण्याची संवय कुठे होती ? त्यांतून मधें पावसाच्या दोन तीन सपाट्याच्या सरीही आल्या. चार दिवसांतच सीता तापानें पडली. सकाळीं तिच्या सोबतिणींनी तिला हांक मारली तेव्हां ती चांगलीच फणफणली होती.

तो सबंध दिवस तिनें पाण्याचे घोट घेत काढला. संध्याकाळीं हवेत जरा गारवा आल्यावर तिच्या अंगाची लाही कमी झाली व तिला ग्लानि आली. त्या गुंगींतच ती कितीतरी वेळ स्वस्थ निजली असती. पण—

तिचें दार आज नुसतेंच लोटलेलें होतें. करकरीत तिन्हीसांजेच्या वेळेला तें ढकलून म्हादबा आंत आला. सीतेला गुंगींत पडलेली पाहून त्याच्या

मनांत पापाचें काय ब्रह्मांड उभें राहिलें असेल, कुणी सांगावें ! त्याच्या कामुक दृष्टीला तिचा गोंडसपणा दिसला. त्याच्या जहरी मनाला तिची दुरुत्तरें आठवलीं. त्याला आपल्या समोरची अमोल संधी दिसली; आणि त्यानें एकदम तिच्यावर झडप घातली.

सीता विजेसारखी जागी झाली, विजेसारखीच क्षणभर कडकडली, धडपडली आणि तिच्यासारखेंच तिच्याशीं झगडणाऱ्या काळ्याकुट्ट मेघापुढें तिचें चैतन्य लुप्त होऊन गेलें. कितीतरी वेळ ती निचेष्ट पडली होती. ती पुन्हां भानावर आली तेव्हां फक्त काहीं असंबद्ध शब्द तिच्या डोक्यांत थैमान घालीत होते. "आतां तरी लावशील ना पाट......."

त्वेषानें, संतापानें तिचें मन भरून गेलें. ताडदिशी उठून कोणाजवळ तरी म्हादबाच्या कृत्याबद्दल जाब विचारावा, असें तिला वाटलें. पण एव्हांनों बाहेर मध्यरात्र किरकिरू लागली होती मधूनमधून ऐकूं येणाऱ्या पानांच्या सळसळीखेरीज कसल्याही हालचालीचें चिन्ह दिसत नव्हतें. सीतेला पहांटे-पर्यंत धीर धरणें भाग पडलें.

सकाळींच ती घराबाहेर पडली व तिने पाटलाच्या चावडीची वाट धरली. अजूनही संतापानें तिचें मन इतकें व्यापून गेलें होतें कीं, स्वतःच्या भावनां-पलीकडे कशाचीही तिला जाणीव नव्हती. म्हादबाची घाणेरडी, कारस्थानी बुद्धि, पाटलाचा पुरुषीपणा, गांवांत एकंदरीतच रूढ असणारी आपल्या-बद्दलची वृत्ति, या कशाचा विचारहि तिच्या मनाला शिवला नाहीं. ती पूर्ण विश्वस्तपणें पाटलाकडे गेली. त्याच्या ठिकाणीं तिला शुद्ध, सरकारी न्यायाचा ठेवाच वाटला.

पण संध्याकाळीं सीतेच्या झोंपडीवरून परतल्यावर म्हादबा कांहीं बेशुद्ध पडला नव्हता. आपल्या कृत्याची नशा उतरतांच त्यानें त्यावर सारवासारव करण्यासाठीं उत्तम तयारी केली. प्रथम आपल्या कंपूतच त्याबद्दल फुशारकी मारून, सीता वश झाल्याची, अखेर पाटालाही तयार झाल्याची बातमी त्यानें एका रात्रींत गांवांत फैलावली. त्यामळें सीता समोर येऊन उभी राहिल्यावर

पाटलानें तिला जरा मिस्किलपणेंच हंसून विचारलें, " कां शिताबाई, मोठ्या पांह्यटेच इकड कुनीकड ? " सीता आपल्या संतापाच्याच तारेंत म्हणाली, " जुलमाचा जाब मागाया, सरकार—"

" अबब—जुलम ! कोनं क्येला शिताबाई ? "

भाबडेपणानें सीतेनें सर्व हकीकत सांगिली. पाटील मधेंच गंभीरपणें म्हणे " अरर—" पण मधेंच त्याच्या तोंडावर अत्यंत अविश्वासाचें, कुत्सित-पणाचें हसूं चमके. अखेर तो म्हणाला,

" शिताबाई—अगुदर कबुली देऊनशान फिरून काहुन मानसावर आग पाखडावी ? आम्हांस काय ठावं नाय व्हय ? सारा गांव म्हने तर मानलं नाय ततच जंगलामधि राह्यलां—म्हादबाच्या शेतावर कामाला जाऊन त्येशी दोस्ती बी क्येली—अन् आतां म्हनता जुलूम ! आम्हासनी रपोट कराया हवाल-दाराकड पाठवून काय त्वांडघशी पाडणार व्हय ! त्यो म्हादबा तर काल रातीपासून पाटाच्या तैयारीला बी लागला !—खूप असान शिताबाई तुम्ही..."

सीता थक्कच झाली. अगतिकपणें ती मटकन् खालींच बसली. " काय बोलून राह्यलां तुमी पाटील..." एवढेंच शब्द कसेबसे तिच्या तोंडून बाहेर पडले. मग हळूंहळूं तिनें पहिली नोकरी जाण्यापासून सर्व हकीकत सांगून पाटलाची समजूत पाडण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याचा काय फायदा होणार होता ? सीतेविषयीं आधींच लोकमत एवढें विरुद्ध झालेलें. तशांत पाटलां-जवळ म्हादबाच्या गुंडगिरीचा वशीला...सीता खरोखरीच अगतिक ठरली ! सुन्नपणें तिनें घरची वाट धरली. जगांत कुठेंही तिला कोणी वाली उरला नव्हता. रानमाळांतून हळूंहळूं ती झोंपडीशीं कशी पोंचली हें तिचें तिलाच कळलें कीं नाहीं कोण जाणे !

घटकाभरांत सीतेच्या व पाटलाच्या संभाषणांतील शब्दन्‌शब्द गांवांत झाला. नाजुक मनाच्या पोरीबाळी म्हादबाचें नांव घेतांच अंगावर शहारे आणीत. पुरुषी जुलमालाच सरावलेल्या बाया पोक्तपणाचा आव आणून

म्हणत..." लई ह्येकड. साऱ्या गांवकऱ्याइनं सांगतलं—त्ये मानती तर येळा टळती ना ह्यो..."

संध्याकाळीं सारजी आली. सीतेचा वठून गेलेला चेहरा पाहून तिला भडभडून आलें. सीता निर्विकारपणे भितीला टेंकून बसली होती. दोन दिवसात चूल पेटलेली दिसत नव्हती. सारजी आली तर तिनें एकवार तिच्याकडे पाहण्यापलीकडे हूं कां चूं केलें नाहीं. सारजीच्या डोळ्याचें पाणी किती वेळ खळेना. शेवटीं मोठ्या कष्टानें तिनें म्हटलें, " शिते, एकली कायला राह्यतिस इथ—चार दिवस चाल ना माह्या घराले..."

सीतेनें चट्दिशीं निर्धारानें मान हालवली, " मल्ये कोन खातो इथ—" ती थोडा वेळ थांबली. तिच्या चेहऱ्यावर विलक्षण कठोरपणा आला. जणूं काय मन घट्ट धरून ती पुढें म्हणली, " येईनच तर त्योच नव्ह कां काळतोंड्या...पाहून घेईन त्येच...तुल्ये कायला गांवकऱ्याइचा तरास..."

यापुढें ती गप्प बसली ती गप्पच. सारजी निरुपायानें उठली व घरीं गेली. सीतेचा एकटेपणा आणखीच दुणावला. आजपर्यंत ती एकटीच होती. पण या प्रसंगानंतर–सारजीची मदत नाकारल्यानंतर, तिचें तें एकटीचें जग अंधारून आलें. आपलें पुढें काय होणार, आपण कुठें जाणार, हें तिला कांहीच समजत नव्हतें. तरी पण एका अनिर्वाच्य निर्धारानें मात्र तिचें मन व्यापून गेलें होतें. तिनें आपल्या मनाची अंधारकोठडी घट्ट बंद करून घेतली होती. अजाणतेपणीं कां होईना, तिला आपल्या एकटेपणाची पूर्ण जाणीव झाली होती, व एकदां धक्का बसल्यावर निदान आपल्या जात-वाल्यापैकीतरी कुणाच्याही आधाराची अपेक्षा करावयाची नाहीं, याची तिनें मनाशीं खूणगांठ बांधली.

*　　*　　*

दुसऱ्या दिवसाची सकाळ सीतेनें अशीच सुन्नपणें घालवली. मग दुपारीं ती उठली, तोंडावरून पाणी फिरवून, लुगडें, केंस जरा सांवरून ती घरा-बाहेर पडली व झोंपडीला कुलुप लावून तिनें एक लांबचा रस्ता धरला.

किती तरी वेळ ती संथपणें चालत होती. रस्ता अगदीं शांत होता, वळणें घेत घेत दूर एका टेकाडावर चढत होता. पावसाळ्यांतल्या त्या लपंडावी उन्हांत रस्त्याच्या दुतर्फा लागलेल्या कडूनिंबाचीं पानें लकलकत होतीं. सीतेचें या सर्वांकडे लक्ष होतें कीं नाहीं कोण जाणें! पण बाहेर पडण्याचा, चालण्याच्या गतीचा व त्या मोकळ्या रानमाळाचा तिच्यावर नकळत परिणाम झाला खास. तिच्या चेहेऱ्यावर जणूं काय हळूं हळूं उजाडूं लागलें. तिची मनोदृष्टि फांकली. तिला कदाचित् वाटलें असेल, " जग किती मोठं आहे—आपली झोंपडी किती लहान आहे...!"

हळूं हळूं ती एका बंगल्यावर पोंचली, व मागल्या बाजूच्या व्हरांड्यावर जाऊन बसली. तिथे तिची जुनी मालकीण रहात असे. बाई बाहेर येताच सीता म्हणाली, " बाई, मल्ये काम द्या."

अशी अचानकपणें तिला आलेली पाहून बाई चकितच झाल्या. त्या म्हणाल्या, " गरज तर आहे ग. अगदीं वेळेवर आलीस तूं. पण इतक्या लांब कशी येणार तूं रोज? तेव्हांचं जुन्या वस्तीतलं घर बरं होतं आमचं..."

सीता शांतपणें म्हणाली, " मल्ये येथ रहाया जागा द्या."

बाईसाहेब आणखीच चकित झाल्या. मागें कामाला वाटेल तितका उशीर झाला तरी रात्रीं परत जाणारी सीता आपणहून ' इथें रहायला येतें,' असें कसें म्हणते, हें त्यांना उमगेना. पण बंगल्याच्या पाठीमागची ती नोकरांच्या खोल्यांची ओळच ओळ, स्वतःची गरज व सीतेचा विश्वासूपणा हें सारें आठवून त्यांनीं तिला ठेवून घेतलें.

दुसरे दिवशीं सीता आपला तुटकाफुटका संसार आणायला गेली. तिनें अशीच कुठेंतरी सारजीची गांठ घेतली. मुर्वतीखातर तिला आपला नवा बेत सांगितला व त्या कास्तकारांच्या वस्तीवर कायमची पाठ फिरविली.

* * *

सीता नवीनच वातावरणांत वावरूं लागली. पण नवें काय आणि जुनें काय? तिचा एकटेपणा कायमच होता. त्या एकटीच्या मनोविश्वांत कधीं

दिशा थोड्या उजळलेल्या असत, कधीं अंधारून आलेलें असे, एवढेंच. पण नवीन कामांत महिना दोन महिने गेले असतील तोंच तिला एक अननुभूत धक्का बसला. पूर्वी कधींही नसेल इतका गडद अंधार पसरल्यासारखें तिला वाटूं लागलें. सर्व बाजूंनी मार्ग खुंटल्याची तिला जाणीव झाली. कारण तिला कळून चुकलें कीं आपल्याला दिवस राहिले.

मधेंच तिच्या मनांत क्रूर विचार येत. मधेंच म्हादबाच्या पाटाच्या लकड्याची आठवण येई. परंतु तें क्षणभरच. तिला एकदम शिसारी येई. तिची मान ताठ होई, चेहरा तीव्र होई व तिचा पूर्वीचा अनिर्वाच्य निर्धार तिचें मन व्यापून टाकी. जगांत कुणालाही शरण न जातां आयुष्य काढण्याचा तिचा संकल्प कायम होई.

तिच्या आंतरिक झगड्यांतच काहीं दिवस गेले. वरवर सर्व शांत सुरळीत-पणें चाललें होते. पण एका स्त्रीच्या अंत.करणांत असा चमत्कारिक धक्का बसला तर त्याचे पडसाद कुठें तरी उमटल्याशिवाय कसे राहणार! टेंकडी-वरच्या वाऱ्याबरोबर हळूंहळूं पसरत ते, सीतेच्या मूळ ठिकाणीं पोंचले कीं काय, कोण जाणे! एक दिवस अचानकपणें सारजी तिच्याकडे आली खरी.

दोघींच्या कांही वेळ इकडल्या तिकडल्या गप्पा झाल्या. मग सारजी हलकेच म्हणाली, " शिते—"

" का म्हनतिस ? "

" म्होट पाटील तुजी लई विच्यारपूस करत्यात. "

" काऊन ? "

" गरीब बापडी—गांव सोडून काह्यला ग्येली, म्हनत्यात. "

" हं..."

" त्याहिस म्हादबासनी पुसाया सांगू का ? "

" कायचं ? "

" पाटाचं...'

सीता चमकली. पण क्षणभरच थांबून पुनः म्हणाली, " काउन ? आज लई दिसांनी काउन तुस सई आलीया..."

सारजी बुचकळ्यांतच पडली; पण पुनः विचार करून ती म्हणाली, " शिते, असं येड काउन घेतेस ? मल्ये मालुम झाल नव्ह का—आतां तुल्ये दुसरा उपाव काय ? पांचसहा महिन्यांनी कुनाकडे जाशीन ? "

आतां मात्र सीता खवळली. " कुनाकड कायले जाइन. अस्से दिवस काहाडिन. त्या म्हादबाचा इचार ह्यो, की ह्ये घाबरल्–अडचणीमंधि गवसल् तर मिंधी होईन. अन् तुमाल्ली बि तसच गमल. पण शिती कई लाचार झाली न्हाई...धन्यासंगं सुख पाह्यलं—धन्यामागं बि दिस काढल... पर कोन्या बि हालतींत कुनाच्या त्वांडाकड पगितल न्हाइ. अन् आता याउप्पर म्हादबाच मी नांव घेइनस गमल तुम्हांस ?..." त्वेषानें तिला बोलवेना. तिचा ऊर हादरून गेला होता. तिनें झर्ररदिशीं आपली संतापलेली दृष्टी सारजीवरून फिरवली व अंतरांत कुठें तरी एका कल्पित बिंदूवर आपला सर्व रोष जणूं रोंखून ती स्तब्ध बसली—आपला असह्य उद्वेग आवरायचा यत्न करूं लागली.

सारजी विमूढ झाली. सीतेचें डोकें ठिकाणावर आहे कीं नाहीं याचीच तिला भ्रांत पडली. हातापायाचें बळ, जिवाजी हिंमत पोट भरायला उपयोगी पडेल. पण त्याच्याच जोरावर उजळ माथ्यानें कसें वावरतां येईल, हें सीतेला कळत नसेल का ? घरंदाज, लेंकुरवाळ्या सारजेला कांहींच उमगेना. कितीतरी वेळ ती विचारांत पडली. मधेंच ती हळूंच चोरट्या दृष्टीनें सीतेच्या धीटपणें, कठोरपणें अंतरांत निरखून पहाणाऱ्या डोळ्याकडे पाही व पुनः जमिनीकडे नजर लावून बोटानें कांहीं तरी चाळा करी.

कांहीं वेळानें ती पुनः हळूंच बोलूं लागली, " शिताबाई, संतापती काउन ? मल्ये बाई तुह्या मनाचा ठावच लागेना. पर तुह्याखातर जीव तुटत राह्यतो—म्हनुनशान म्हनत्ये आपली काइबाई तुस नसल रुचत तर न्हाइ काढनार पाटाची बात. पर—पर—तूं कसं करशीन—कोठ जाशीन ? "

" मल्ये नाय मालुम.—येइन परसंग तवा पाहुन घेईन..."

पुनः स्तब्धता–पुनः सारजीचीच बोलायला सुरवात. पण तिचा आवाज यावेळीं अत्यंत संदिग्ध, अत्यंत कांपरा येत होता.

" शिते—गांवच्या मारुतीच्या देवळाजवळ योक म्हतारी राह्यते. तिच्या पाशीं एक जडीबुटी हाये. त्येच्यान तू चार दिसात मोकळी होशिन."

सारजीला वाटलें होतें कीं एकदां बोलून टाकलें कीं जीव हलका होईल. ती खरी आली होती हाच मार्ग सुचवायला. साऱ्या रस्ताभर ती हेंच घोकत मन घट्ट करीत चालली होती. पण तीच गोष्ट तोंडून गेल्यावर तिला कसें-सेंच वाटूं लागलें. मातृत्वाचा अनुभव घेतलेला तिचाच जीव जणूं गुदमरूं लागला...ती भेदरून जाऊन सीतेकडे पाहूं लागली......

सीतेला क्षणभर कांहीं उमगेना. तिनें हळूंहळूं सारजीच्या नजरेला नजर भिडवली व मग तिच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला. ती चम-कली...तिच्या नकळतच तिचे दोन्ही हात तिच्या तोंडावर गेले. तिनें आपली मान गुडघ्यांत खुपसली व आंतूनच स्फुंदून स्फुंदून म्हणाली, " नको व सारजामाय...नको अशी बोलूं...माह्या रक्तान पोसल्ये मी ह्यो जीव. त्योच राहील आखिर माह्यापाशीं—मल्ये माय म्हनल."

हुंदक्यांनीं तिचें सबंध शरीर हादरून गेलें. किती तरी वेळ ती ओक्साबोक्शीं रडत होती. तिचा जीव इतक्या उत्कटपणें हेलावण्याचा तिच्या आयुष्यांत कदाचित् हाच पहिला प्रसंग असेल. सारजीच्याही डोळ्यांतून एकसारखे अश्रू झरत होते.

* * *

संध्याकाळ झाली म्हणून सारजी गेली. सीतेनें आपल्या मनाला बरेंच सांवरलें व ती आपल्या कामाला लागली. पण त्या संभाषणानें तिच्या विचारांना नवीनच दिशा मिळाली. तिला पुढें येणाऱ्या प्रसंगाची, जन्माला येऊं घातलेल्या जीवाच्या भविष्याची जास्त स्पष्टपणें कल्पना येऊं लागली. त्याच्या विषयींच्या स्वतःच्या भावनांची जाणीव होऊं लागली. तसतसा तो

जीव तिच्या सर्व आशांचें केंद्र बनूं लागला...म्हादबाचा त्याच्याशीं असलेला संबंध ती विसरतच चालली.

रात्रभर ती विचारांत तळमळत होती. सकाळीं कामाला लागली तीही विचारांच्या तंद्रीतच. दोन प्रहरीं बंगल्याच्या मागल्या पडवींत ती निवडण करीत बसली, तेव्हां विचारांच्या उत्कटतेनें ती स्वतःला जवळ जवळ विसरून गेली. तिच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले. पलीकडे एका पलंगावर बाई कांहीं विणीत बसल्या आहेत, याचेंही तिला भान राहिलें नाहीं.

त्यांनी तिच्याकडे एकदोन वेळां निरखून पाहिलें. नंतर विचारलें, " सीते—काय झालं ग ? "

सीता दचकली. पण चट्‌दिशीं उठली, बाईजवळ जाऊन तिने त्यांचे पाय धरले. तिच्या मनाचा बांध पूर्ण फुटला. तिने बाईजवळ सर्व पाढा वाचला व म्हणाली—

" बाई—मल्ये तुम्हीबी लोटूं नका. ल्येक समजा आपली—कसं बि असन–पर–माह्या पोराचा जीव घ्यायास मन होत नाय. दुनियेमंधि तितलंच हाय पगा माझं—तुम्ही आसरा द्यान तर त्याच्याकड पगूनशान दिवस निंघतील माझं..."

बाईनीं सीतेला पूर्ण आसरा दिला. तिच्या मुलाच्या जोपासनेची तिथेंच व्यवस्था करण्याचें अभिवचन दिलें. सीतेचें अंतःकरण स्वतःच्या कक्षेच्या बाहेर गेलें. जगरहाटीच्या दृष्टीनें ती भ्रष्टा ठरली होती. परंतु त्यांतूनच तिच्या हिंमतीमुळें तिच्या जीवनांत हेतू आला. त्या रात्री झोंपेंत तिच्या चेहेऱ्यावर जी गोड शांति विलसत होती, ती तोंपर्यंत तिथें कधींच दिसली नव्हती.

सप्टेंबर १९३४

---

# छाया प्रकाश

चैत्राचें ऊन तळपत होतें. दुपारची स्तब्धता सर्वत्र पसरली होती. मध्येंच वावटळ उठे. भाजून काढणारा वारा सगळीकडे भिरभिरूं लागे. पण तोच भाजणारा वारा माझ्या खोलीत येतांना किती बदलून जाई ! माझ्याजवळ तो दाराला लावलेल्या ताटीच्या वाळ्याचा सुगंध घेऊन येई; ताटीवर अविरत शिपडल्या जाणाऱ्या पाण्यानें थंडगार होऊन येई. दरवेळी मला वाटे, " उन्हाळ्याची खरी मजा येत चालली आतां ! काय सुंदर वारा आला..."

शेजारच्या आवारांतून मधेंच धाड् धाड् आवाज आला. ठराविक ठेक्यावर तो दुहेरी आवाज चालू राहिला. धाड्–धाड्, धाड्–धाड् ! दोन मजूर मोठमोठे लांकडाचे ओंडके फोडीत होते.

बिनचूकपणें ते एकामागून एक घाव घालीत. एखाद्या यंत्रासारखीं त्यांचीं शरिरें वर होत, हात उंचावले जात व पुनः धाड्दिशीं कुऱ्हाड लाकडावर आदळे. त्यांना भोंवतालच्या कशाचीही जाणीव राहिली नसावी.

आणि ती नव्हती म्हणूनच बरें होतें. श्रमानें त्यांच्या शरिरांची शीरन् शीर फुगलेली दिसत होती, स्नायू पिळवटून निघाले होते. चेहऱ्यावर

कांहींच भाव उरला नव्हता. ते दोघे घामानें थबथबून निघाले होते. कदाचित् तो भाजणारा वाराहि त्या घामामुळें थंड होत असेल !

मधेंच त्यांनीं कुऱ्हाडी ओंडक्यावर टेंकल्या व दुसरा हात कमरेवर देऊन ते उभे राहिले... भोंवतालीं काय रखरख पसरली होती !

* * *

हस्ताच्या पावसाच्या सरीवर सरी कोसळत होत्या. लोनावळा–खंडाळा घाटांतून माझी गाडी धाड् धाड् करीत चालली होती. पण तिचा आवाज देखील पावसानें लोपून टाकला होता. दऱ्याखोऱ्यांतून नवजीवन नाचत होतें. झाडें सरीशीं झुंज खेळण्यांत रंगून गेलीं होतीं. चैतन्य–चैतन्य पसरलें होतें सगळीकडे !

मी सृष्टीशीं समरस होण्यांत धन्य मानणारी. माझेंही मन आनंदानें बहरून गेलें.

गाडी वळली. पावसाची सर खिडकीवाटे थोडी आंत आली. मी पायावरलें मऊ रग आणखी वर ओढलें, जरा बाजूला सरकून पावसाचे तुषार टाळले, व पुन्हां बाहेर मन लावून पाहूं लागलें

मला वाटलें, किती आल्हाद सांठविलेला आहे सृष्टिसौंदर्यात !

घाट संपून माझी गाडी कल्याणच्या जवळपास पोंचली होती. जिकडे तिकडे एवढीशी, चौकोनी भाताचीं शेतें दिसूं लागलीं होतीं. आडवीं, तिडवीं, तिरपीं, सरळ वाटेल तशीं पसरलीं होतीं तीं. त्यांचे ते मातीचे बंधारे, त्यांच्या सीमेंत सांठलेलीं लहान लहान तळीं, पावसाच्या थेंबागणिक त्यांत उठणारीं वलयें...सर्वच मनोहर होतें.

तितक्यांत माझ्या दृष्टिपथांत एक माणसाची आकृति आली. त्याच्या डोक्यावर एक पानांचें इरलें होतें. तेवढेंच काय तें त्याचें आच्छादन. त्यावर पाण्याचे थेंब तडाल् तडाल् करीत आपटत व परत उडत. इरल्याच्या वजनानें व तोंडावर होणाऱ्या पाण्याच्या माऱ्यानें त्यानें मान खालीं घातली.

होती. तो फक्त एक लंगोटी नेसला होता. त्याचें काळेंकभिन्न शरीर पाण्याच्या तुषारांनीं चमकत होतें. त्याच्या दर पावलागणिक पायभरून चिखल वर यत होता.

तो आपल्या जमिनीच्या तुकड्याचा बंधारा नीट आहे कां नाहीं, तें पाहायला आला असावा. भात पेरायची वेळ जवळ येत चालली होती. मग जमिनीची निगा नको का राखायला? त्यानें क्षणभरच धांवत्या गाडीकडे नजर फेंकली. त्याचा पाय घसरण्याच्या बेतांत होता......तोल सांवरून तो क्षणभर दम खात उभा राहिला.

* * * *

हिंवाळा ऐन रंगांत आला होता. खेड्यावरून वाणी पिकल्याची वर्दी आली. म्हणून आम्ही खूपजण मिळून हुर्ड्याच्या सोहळ्याचा मोठा बेत केला. एक दोन दिवस खेड्यांतील जीवनाचा आनंद लुटायला तिथेंच जाऊन राहिलों.

दिवसभर, पिळला तर दूध निघेल इतक्या कोवळ्या हुर्ड्यावर चरावें या शेतांतून त्या शेतांत भटकावें, झाडावरचे ताजे पेरू तोडून खावे, मोटेच्या पाण्यांत खेळावें, यांत आमचा वेळ केव्हांच निघून गेला. रात्रीं थंडीचा कडाका जरा जाणवूं लागतांच सुंदरशी शेकोटी पेटवायचा हुकूम सुटला व तिच्याभोंवतीं गप्पाष्टकांचा फेर धरला गेला. नुकतींच आमचीं जेवणें उरकलीं होतीं. दुधाच्या खुसखुशीत भाकरी, लोण्याचे गोळे, दह्याच्या कवड्या, हुर्ड्याचे वडे, वांग्याची भाजी, एक ना दोन ! सर्वांचे अंतरात्मे खुष झाले होते. शेकोटीच्या उजेडांत प्रत्येकाचे चेहरे कसे प्रसन्न दिसत होते. 'खेड्यांतील जीवन म्हणजे निसर्गाच्या मांडीवर, अगदीं स्वाभाविकतेचें राज्य !–काय आनंद आहे !' हाच भाव जणूं प्रत्येकाच्या चेहऱ्यावर उमटला होता.

तितक्यांत एक ललकारी ऐकूं आली. 'रामा—रामा रऽऽऽ, वाणी

नीट राखजो ऽ ऽ. पाह्यटे पांखरं हुश्यारीन हाण रऽऽऽ' उद्यां लई पाव्हणं येत्याल......"

"हां ऽ ऽ ऽ."

"पाह्यटिल्ये भाकर घेतली का रऽऽऽ."

"हो जीऽऽ."

आमची गप्पाष्टकें संपली. खाटेवर जाऊन दुलईत शिरतांच मला केव्हां झोंप लागली, कळलेंही नाहीं. पुनः जागी झालें तेव्हां पहांटेचें चांदणें पसरलें होतें. अंगाला झोंबणारा वारा वहात होता. उशाकडची खिडकी बंद करायला मी उठलें.

बाहेर पांखरांची किलबिल सुरू झाली होती. एकदम एक कळपच उडाल्यासारखा 'भर्रर्रर्र' आवाज झाला. त्याच्या पाठोपाठ एक उंच ललकारी आली, "हर्रर्रर्र पांखरा, हर्रर्र ऽऽऽ!" लगेच दोन, तीन, चार गोफणीचे दगड आले. त्या दिशेनें मीं दूरवर पाहिलें.

पहांटेच्या वाऱ्यानें डोलणाऱ्या वाणीच्या कणसांच्यावर रामाचा कडब्याचा माळा थरथरत होता माळ्यावरच्या खोपडीसमोरच्या चवुतऱ्यावर अस्ताला जाणाऱ्या चंद्राकडे पाठ केलेली रामाची आकृति दिसत होती. गोफण भिरकावण्यासाठीं त्यानें उजवा हात उंचावला होता तशांतही, थंडीच्या त्या असह्य माऱ्यामुळें त्याला घोगडीचा मोह सोडवत नव्हता. डाव्या हातानें तो अर्ध्या शरिराभोंवती गुंडाळलेली घोगडी सांवरीत होता.

पुन्हां एक पांखरांचा कळप आला. पुन्हां रामाचा पोरवजा आवाज आला, "हर्रर्रर्र पांखरा, हर्रर्र—"

एप्रिल १९३५

---

# विचारशील प्राणी

त्या दिवशी मी फारच खुषींत होतें. एकंदर मानवी जीवनाबद्दलच माझें मन समाधानानें भरून गेलें होतें. माझ्या बरोबरीच्या मंडळींत या विषयावरच कितीतरी वेळां वादविवाद होत, व त्या बैठकींत स्वतःला कट्टर आशावादी म्हणवून घेण्यांत मला अभिमान वाटत असे. हा माझा आशावाद नेहमी मनुष्यांतल्या अनंत दिव्यत्वावर, त्याच्या आत्मिक सामर्थ्यावर उभारलेला असे. कधी तर मी इतकेही म्हणावें की, स्वतःच्या हृदयांतल्या या दिव्यत्वाची जाणीव जर प्रत्येकाला झाली, तर जगांत दुःखी असा कोणी उरणारच नाहीं. या माझ्या विश्वासाला त्या दिवशी एका फारच मोठ्या व्यक्तीकडून दुजोरा मिळाला होता. एका प्रसिद्ध अध्यात्मवादी वक्त्याचें व्याख्यान ऐकून मी नुकतीच घरीं परत आलें होते. एक तऱ्हेच्या विजयानंदानेंच त्या व्याख्यात्यांच्या शब्दांची पुनःपुन्हां स्वतःला आठवण करून देत येतांना रस्ता केव्हां संपला तेंही माझ्या लक्षांत आलें नाहीं. त्या दिवशी, मनुष्य हा अत्यंत विचारशील प्राणी आहे, विचारांतच मनुष्याचें मनुष्यत्व आहे, त्याच्या जोरावरच त्यानें आपलें जीवन किती सौंदर्यमय, किती पुण्यमय बनवलें आहे, हे व्याख्यात्यांनीं पूर्णपणें पटवून दिलें होतें.

विचाराच्या नादांतच मी खोलीचें कुलूप काढलें व दिवा लावला. व्यावहारिक जगाशीं विशेष संबंध नसलेल्या विद्यार्थ्याला साजेसाच माझ्या खोलीचा अवतार होता. गतकालच्या कित्येक विचारवंतांच्या ग्रंथसंपत्तीनें माझी खोली भरून गेली होती. त्या ग्रंथांचें परिशीलन करावे, त्यावरच विचार करावा, त्यांतील उदात्ततेंतच रमून जावें हा माझ्या आयुष्याचा क्रम होता. खरोखरी केवढा समाधानाचा सांठा माझ्याजवळ होता! जगांतले सारे दुःखी प्राणी माझ्याकडे आले असते, तरी मी त्यांना समाधानाचा पुरवठा करूं शकलें असतें. माझ्याजवळचे ग्रंथ म्हणजे मानवी विचारशक्तीच्या परमावधीचीं मूर्तिमंत उदाहरणें होतीं. त्यांत मानवी दिव्यत्व प्रतीत झालें होतें. म्हणूनच त्यांत जिवाला विसांवा,—विरंगुळा मिळण्यासारखा होता. साधारण माणसांना हा विसांवा अजून सांपडला नव्हता का? हें समाधान त्यांच्यामध्यें प्रसृत करण्याचा प्रयत्न अजूनपर्यंत कोणींच कां बरें केला नव्हता?

हें कोडें सुटेना म्हणूनच कीं काय, माझा विजयानंद जरासा ओसरला. मीं सहज खुर्चीवर अंग टाकलें व विचार करूं लागलें.

इतक्यांत शेजारच्या बिऱ्हाडांतून आवाज आला. कांहीतरी जमिनीवर पडून खळदिशीं फुटलें व कुणाच्या तरी पाठींत ‘ धप् धप् ’ धपाटे बसले. कोणीतरी बाई म्हणाली, “ करूं तरी कसं रे तुम्हांला? संध्याकाळ झाली कीं ऊत येतो जसा कांहीं तुमच्या खोड्यांना! हज्जारदां सांगितलं, त्या कोनाड्यांतल्या पेल्यांना हात लावूं नका म्हणून. घटकाभर स्वस्थ बसलां तर बिघडेल जसं कांहीं. कुठले पूर्वजन्मीचे वैरी आले आहेत छळायला—”

कितीतरी वेळ तिची बडबड चालली होती, व मुलेंही मोठ्यानें रडत होतीं.

संध्याकाळची वेळ. ललितकलांच्या कोणीही उपासकाला या वेळेचें नुसतें नांव घेतांच कितीतरी काव्यमय गोष्टी आठवतील, कितीतरी तऱ्हांचें सौंदर्य त्याच्या मनःचक्षूंपुढें उभें राहील! कुणाला संध्येचे रंग आठवतील, कुणाला घरट्यांत परतणाऱ्या पक्ष्यांचे थवे दिसतील, कुणी कामावरून येणाऱ्या प्रिय-

जनांच्या मीलनांचीं चित्रें रंगवतील !–माझें तोंवरचें आयुष्य व्यावहारिक जगापासून अलिप्तच होतें. तरी संध्या म्हटली कीं, माझ्याही मनांत अशाच कांहींतरी कल्पना उभ्या रहात. पण आज कोण जाणे कां, या धपाट्यांच्या ‘ धप्‌धप्‌ ’ आवाजानें माझ्या मनांतलीं हीं सर्व चित्रें विलयाला गेलीं व मी एका नवीनच दृष्टीनें आपल्या भोंवतालचें जग शोधूं लागलें.

तिन्हीसांजेला लक्ष्मी घरांत येते, असें पूर्वापार आपण मानीत आलों आहोंत; परंतु कुठल्याही साधारण घरांत पाहिलें तर काय दिसेल ? लक्ष्मी-ऐवजीं अवदसा मात्र घरांत आल्यासारखी वाटते. घरोघरीं थकलेले पुरुष, थकलेल्या बायका, रडणारी मुलें, मिणमिण जळणारे दिवे !...माझ्या शेजारीं दररोज संध्याकाळीं हीच अवस्था असे. ‘ धप्‌धप्‌ ’ मारणाऱ्या बाईला मुलां बद्दल प्रेम वाटत नसेल का ? त्या बिचाऱ्या मुलाना मोकळेपणानें खेळायला–बागडायला जागा नव्हती. ती घरांत कारभार करणारच व फोडतोड होणा-रच, हें तिला समजूं नये का ? या मुलांच्यापैकीं कुणालाही कांहीं एवढासा अपाय झाला तर तिच्या जिवाचं पाणी होईल; अन् तीच त्यांना पूर्वजन्मींचे वैरी म्हणते आहे ! तिनें थोडा विचार करायला नको का ?

असेंच दृश्य मीं कितीदां पाहिलें होतें. लहान मुलें म्हणजे पृथ्वीवरला अमोल आनंदाचा ठेवा. माझें तोंवरचें आयुष्य केवळ ग्रंथसंभारांत गेलेलें; पण मलादेखील कधींकाळीं कुठून तरी कानावर आलेले बोबडे बोल आठवले कीं हृदय भरून आल्यासारखें वाटे. या इतक्या गोड जीवांना हवें तस मोकळें, स्वच्छंद वातावरण मिळूं नये व मग आपल्या उत्साहाला, धडपडीला कसा तरी वाव देण्याकरितां त्यांनीं कांहीं उपद्व्याप केला, कीं त्यांच्या पाठींत धपाटे मिळावे, हें विचारशीलत्वाचेंच लक्षण का ? वडील मंडळींनींच पोंच ठेवून अगोदरच त्यांचीं मनें सुरक्षितपणें व योग्यपणें गुंतवून ठेवायला नकोत का ? हें तरी असो, पण कित्येकदां तर मी असेंही पाहिलें होतें कीं, घरांत कांहीं असंतोषाचें कारण झालें–नोकरांनीं त्रास दिला, आईवर बाबा रागावले, किंवा आणखी कांहीं बिघडलें कीं, वज्याचें तेल वांग्यावर निघा-

लेंच !...वडील माणसांना शुद्ध विचारानें आपली बुद्धि समतोल राखतां येत नाही का ? चिडचिड, संताप वगैरे क्षणिक विकार दाबतां येत नाहीत का ? का ही शक्ति त्यांच्यामध्ये नसतेच ? जीवनांतील प्रत्येक गोष्टीबद्दल तारतम्यभाव राखणें व तिच्या अंतिम मूल्याकडे दृष्टि ठेवूनच भावनांना सैल सोडणें, याचेंच नांव विचार. भावनांतील याच शक्तीच्या आधारावर मीं माझा जीवनाविषयीचा आशावाद उभारलेला आहे ना ?

पण त्या आईनें तरी विचारीनें काय काय करावें ? पहांटेपासून रात्रीं-पर्यंत घरांतल्या कामामुळें, आणि मुलांच्या दंग्यामुळें तिला क्षणाचीही उसंत मिळत नाही. तशांत जर पतिराज ऑफिसातून कुणाची बोलणी खाऊन, चिडून आले, तर मग विचारायलाच नको. तिच्या सहनशीलतेलाही कांहीं मर्यादा असणारच, व सर्वच गोष्टी परमावधीला पोंचल्या, की ती आपला वैताग कुणावर तरी पाखडणारच. पोटच्या मुलांइतके तिच्या हक्काचें दुसरें कोण आहे ?

पण सहनशीलता कसोटीला लावली जाईपर्यंत मनुष्यानें आपला व्याप कां वाढवावा ? दूरवर दृष्टि ठेवून स्वतःच्या आटोक्यांत असेल एवढाच संसार माणसानें कां थाटूं नये ? कोणाही उच्च दर्जाच्या कलावंताकडे पहा. त्याच्या कोणत्याही कलाकृतींत तीतील भावनेला पोषक असा मोजकाच शब्दसंसार अगर रंगांची, स्वरांची योजना दिसेल. जिवन ही तर सर्वश्रेष्ठ कला आहे. प्रत्येक मनुष्यानें त्यांत अर्थपूर्णता, रेंखीवपणा आणण्यासाठीं झटायला नको का ? मानवी विचार सर्व येथेंच एकवटायला पाहिजेत.

असे कित्येक विचार माझ्या मनांत घोळूं लागले. मला जास्तच अस्वस्थ वाटूं लागलें. माझ्या तुटपुंज्या अनुभवाचें मी आणखी निरीक्षण करूं लागलें. त्या रात्रीं झोंप लागेपर्यंत माझे तेच विचार चालू होते. सकाळीं मी गड-बडींतच उठलें व प्रातर्विधि आटोपून कामाला जाऊं लागलें.

एकदां रस्ता पायांखालचा झाला, की आपली चालण्याची क्रिया बहुतेक नकळतच होते. इतकेंच नव्हे—त्या चालीच्या छंदावर विचारांनाही चालना

मिळते. त्याच छंदानें माझी विचारमालिका पुन्हां सुरू झाली. रात्रीचें ते आईचे धोपटणें, माझ्या स्वतःच्या अनुभवाचें संशोधन, सर्व पुन्हां आठवलें. इतक्यांत माझ्या अगदीं जवळच कोणीतरी ओरडलें—

"अरे रे रे रे ऽ ऽ, कमाल केली या महारड्यांनीं ! डोळे उघडे ठेवून चालाल की नाही रे—"

ओरडणारी व्यक्ति गंध, भस्म, पगडी व उपरणें यांनीं युक्त असे एक ब्राह्मण महाशय होते. लगबगीनें शाळेंत जाणारीं कांहीं काळीसांवळीं महारांचीं मुले त्यांना घसटून गेलीं व गुरूजींच्या अस्खलित वाणीला चालना मिळाली. रस्त्यांत कांहीं वेळ थांबून त्यांनी तोंडसुख घेतलें; नंतर पुन्हां त्यांनी आपला रस्ता धरला. तरीही कितीतरी वेळ मला त्यांची नामावळी ऐकूं येत होती.

शुद्ध विचाराच्या दृष्टीनें मी झाल्या गोष्टीचा विचार करूं लागलें. गुरूजी कां संतापले ? त्या मुलांच्या स्पर्शाने त्यांना इजा झाली नाहीं, त्या मुलांच्या अंगावर घाण नव्हती, त्या मुलांना कुठला रोग झाला नव्हता, मग गुरू-जीचा धर्म बुडाला कसा ? शरिरानें व मनानें निर्मळ अशा कांहीं व्यक्तींचा जातां जातां स्पर्श झाला, तर या धर्ममार्तंडाला विटाळ कसा झाला ? धर्म म्हणजे काय, ती मुलें कशीं होतीं, विटाळ म्हणजे काय, याचा समतोलपणें, तर्कशुद्धपणें गुरूजींनीं कधी विचार केला असेल का ? आयुष्यांतला एक दिवस तरी त्यांनीं विचारात घालवला असेल का ? अशा तऱ्हेचे गुरूजी, याच ठशाचे लोक जगांत कितीतरी असतील ! कदाचित् समाज खरोखरी यांचाच बनलेला असेल. मग मनुष्य हा विचारशील प्राणी आहे का ? माझ्या आशावादाला कांहीं आधार आहे का ?

दिवसभर माझें काम चालूच होतें. पण सारा वेळ मनापुढें एक गंगा-जमनी चित्र उभे होतें. क्षणांत माझ्या खोलीतल्या ग्रंथसंभाराची आठवण होई व त्यांतील विचारांच्या प्रभेनें डोळे दिपून जात. दुसऱ्याच क्षणीं काल-पासून जें जें पाहिलें, आठवलें, तें समोर उभें राही व साधारण जनतेच्या

जीवनांतील विचाराच्या अभावानें मन विमूढ होई. या दोन्हींचा संयोग होऊन, अलौकिकांच्या विचारप्रभेनें साधारणांच्या जीवनांतील अंधार नष्ट कसा होणार, हा प्रश्न मला भंडावून सोडूं लागला.

अलीकडे, जे लोक संपत्ति सांठवतात व तिच्या योगें प्रबल होतात, त्यांच्यावर सर्वांचा डोळा असतो. त्यांची संपत्ति त्यांच्यापासून हिरावून घेऊन सर्वांमध्यें वांटली जावी, सर्वसाधारणांच्या सुखासाठीं तिचा उपयोग व्हावा, असा लोक–धुरीणांचा आग्रह; परंतु या संपत्तीहून अधिक प्रभावशाली अशी ही विचारसंपत्ति गठ्ठयांनिशीं धूळ खात पडलेली असते, त्याची वाट काय? माझ्यासारख्याच कांहीं पुस्तकांतल्या किड्यांना तिचें दर्शन होतें, पण त्या दर्शनानें आमची दृष्टि इतकी दिपून जाते कीं, त्यानंतर आम्हांला व्यावहारिक जग दिसेनासें होतें. आम्ही माना डोलावीत, व त्या अलौकिकांचे स्तुतिपाठ गात बसतों; पण त्या विचारप्रभेनें प्राणिमात्रांचें जीवन तेजोमय करण्याची आम्हांला कधीही स्फूर्ति होत नाहीं. ही वाङ्मयसेवा कुणापाशीं रुजूं होईल?

तो दिवस माझ्या आयुष्यांत फारच संस्मरणीय झाला. तोंवरचीं जवळ जवळ पसतीस वर्षें मीं जगापासून अलिप्तपणें काढलीं होतीं. मी जीवनाबद्दल विचार करीं. कारण माझे सततचे सोबती–माझे ग्रंथ, मला जीवनाबद्दलच विचार करायला लावीत. पण माझा विचार तेवढ्यापुरताच असे. वाङ्मयांत दिसलेली उदात्तता, वाङ्मयांत सांपडलेलें मनुष्याचें विचारशीलत्व सत्यसृष्टींत शोधायची मला कधीं बुद्धिही झाली नाही. मग त्यांच्या अभावी उद्भवणारें दुःख व मनाची निकृष्टावस्था दूर करण्याचा प्रयत्न माझ्या हातून होणें अशक्यच होतें.

तोंवरचें माझें आयुष्य किती व्यर्थ गेलें होतें? दिवसभर संस्कृतसारखा समकालीन जीवनाशीं फारच थोडा संबंध असलेला विषय समजावून देण्यासाठीं डोकेफोड करावी, उरलेल्या वेळांत इतर आवडत्या पुस्तकांच्या वाचनानें डोक्याला विश्रांति द्यावी, हाच माझा कार्यक्रम होता व एवढ्याच

अनुभवावर मी मानवी विचारशीलत्वावर माझा आशावाद उभारला होता. पण उभ्या आयुष्यांत मीं कुणाचें कांहींतरी बरें करण्यासाठीं यत्किंचित् तरी झीज सोसली होती का?

तो दिवस खरोखरच मला फार संस्मरणीय झाला. मी आपल्या जागेचा राजीनामा दिला. आपल्या इतक्या जुन्या बाई गेल्या, म्हणून मुलींना फार वाईट वाटलें; पण मला माझा पुनर्जन्म झाल्याचा आनंद वाटला. मीं आपली रहायची जागाही बदलली आणि ज्यांच्यामध्यें राहून मला चार समाधानाचे शब्द सांगता येतील, जे थोड्या सहवासानंतर मला आपलीं सुखदुःखें सांगून माझें म्हणणें ऐकून घेतील, अशा एका साधारण लोकांच्या वस्तीत येऊन राहिलें. आयुष्यांतील क्षुल्लक बाबींबद्दलही लोकांना विचार करायला कसें लावतां येईल, याची मला तळमळ लागली आहे. माझ्या भोंवतालच्या चार दोन लोकांमध्यें तरी, जीवनकलेंत पारंगत बनण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न करणें, हें माझें ध्येय होऊन बसलें आहे. माझा ग्रंथसंभार, तऱ्हतऱ्हेच्या कलाकृतींचें माझें भांडार माझ्याजवळच आहे. पण आतां याचा मी माझ्या एकटीसाठींच आस्वाद घेत नाही. त्यांतील प्रतिभेच्या योगानें माझ्या भोंवतालच्या रानाचें उपवन कसें होईल, या दृष्टीनें मी त्यांकडे पहात असतें. म्हणूनच कीं काय कोण जाणें, मला तें अलीकडे जास्तच तेजस्वी दिसत असतें!

फेब्रुवारी १९३२

---

# निराशेंतून

काय गोड वेळ आहे ही ! दिनू, दररोज दुपारीं आपल्या घरांत, घराभोंवतीं एवढं शांतिसाम्राज्य पसरलेलं असतं—पण तूं मात्र त्याचा आनंद उपभोगायला कधींच नसतोस. काय करीत असशील तूं यावेळी ? कुणाचं तरी भाडोत्री भांडण भांडत असशील, नाहींतर त्या मधमाशांच्या पोळ्यासारख्या गजबजलेल्या बाररूममध्यें बसून त्रासला असशील, झालं !—कोण जाणें, पण–तुला तिथेंही मजा वाटत असेल कदाचित्. तुम्हां पुरुषांना नाही तरी बाष्कळ बडबडीची हौसच असते, होय ना ? कसंही असो, दररोज अकरा वाजतांच्या उन्हांत, जेवल्याबरोबर आपलं खोगीर चढवून सायकलवरून तूं निघालास कीं मला कसं भडभडून येतं. सारी सकाळ आपण इतकी खेळीमेळींत घालवतों. पण तुझ्यामाझ्या दुपारच्या कार्यक्रमांत मात्र केवढा फरक ! तुझ्या डोक्याशीं एकसारखी कटकट, दररोज दगदग, तर मी आपली थोडीशी कांहीं आवराआवर झांकपांक केली, कीं झालें मोकळी. मग संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत अनिर्बंधपणें कोणताही आवडता उद्योग करायला पूर्ण स्वातंत्र्य.

आणि अलीकडे माझा सर्वात आवडता उद्योग कोणता होऊन बसला

आहे, माहीत आहे? या आपल्या लहानशा व्हरांड्यावर बसून कांहींतरी विचारांत गुंगत पडायचं. ही वेळच जणू इतकी विचारमय असते कीं अत्यंत धडपड्या स्वभावाच्या माणसालामुद्धां स्वस्थ पडून आपल्याच विचारात मग्न व्हावंसं वाटेल. असं मोकळ्यावर येऊन पडलं की प्रथम सृष्टीतली नाजुक हालचाल लक्ष वेधून घेते. अन् मग तिच्याकडे पहात पहात वृत्ति केव्हां अंतर्मुख होते, तें कळतदेखील नाहीं......आपल्या दारासमोरचं तें उंच चिलमिलचं झाड आहे ना? त्याच्या शिखरावर लटकलेले पिवळ्या फुलांचे घोंस उन्हांत किती डौलदारपणें तळपत असतात. अन् खालची पाने... एवढा मोठा वृक्ष पण त्याची पानें किती चिमुकली. जराशी वाऱ्याची झुळुक आली की लवलव करतां करतां पुरेवाट होते त्यांना. अगदी लहान मुलांची वृत्ति जशी. थोडंसं कांही कारण मिळालं कीं लागली नाचायला. मला भारी आवडूं लागलीं आहेत तीं.

या चिलमिलच्या झाडपलीकडेच एक बाभळीचं झाड आहे. बिचाऱ्याच्या अंगावरून कसलं वारं गेलें कुणास ठाऊक—काय अजब वेडंवांकडं वाढलं आहे! अन् आतां तर वठूनही गेलं. काळंकुट्ट पडलेलं त्याचं तें खोड आपल्या कोनाकोनांनी बनलेल्या आकृतीनें आकाशावर स्पष्टपणें उठून दिसतं. त्याच्याकडे पाहिलं कीं अनंत दुःखाने गांजून जाऊन विरक्त झालेल्या माणसाची मला आठवण होते. त्याला पुनः कधीतरी प्रफुल्लतेचे दिवस येतील का? कुणी सांगावं! जीवनांत कितीतरी चमत्कार घडून येत असतात. लांब कशाला? दिनू, तुला माहीतच आहे ना, माझं स्वतःचंच जीवन एकदां या बाभळीसारखं वठून गेलं होतं. शेजारीच डोलणाऱ्या चिलमिलचा जीवनानंद माझ्या स्वप्नीही दिसत नव्हता. पण तो आनंदही माझ्या वाट्यांत होता. आज त्या चिलमिलच्या चिमुकल्या पानासारख्याच एवढ्याशा आनंदानेंही माझ्या वृत्ति नाचूं लागतात.

व्हरांड्यांत येऊन बसलं कीं हाच विचार आतांशा माझ्या मनांत एकसारखा घोळत राहतो. माझ्या आयुष्यांतील त्या बाभळीसारख्या अवस्थेच्या स्मृतींची गर्दी होऊन जाते......

## दीपकळी

मी कॉलेजांत गेलें तेव्हां जेमतेम १६ वर्षांची होतें. माझी आई आधींच जुन्या मताची. उच्च शिक्षणाने मुलींच्या डोक्यांत कांहींतरी वेड शिरतं अशी तिची खात्री. तशांत कॉलेजच्या वातावरणाबद्दल कितीतरी गप्पा तिच्या कानीं आल्या होत्या. मी घर सोडण्याचा दिवस जसजसा जवळ येत होता, तसतशी तिची माझ्याबद्दलची काळजी वाढत होती. शेवटीं, एकदां ती मला म्हणालीच, "मने, जातेस खरी कॉलेजांत. यांच्यापुढें माझं काय चालणार? पण माझं आतांपर्यंतचं सारं सांगणं लक्षांत ठेव हो. कितीही शिकलीस तरी अखेरीस जगांत तुला आम्हां बायाबापड्यांचे शब्दच उपयोगी पडतील. उगीच कोणाशीं अघळपघळ बोलूं नकोस, कुणाशीं संबंध वाढवूं नकोस. आपण बरं कीं आपला अभ्यास बरा. तरी एवढं बरं कीं तुला त्या बोर्डिंगांत ठेवायचा आग्रह नाहीं धरला त्यांनीं. तेवढं तरी माझं ऐकलं. गोदूताईच्या घरीं तूं राहशील, म्हणून माझी अर्धीअधिक काळजी दूर झाली. तिच्या आईचा व माझा भारी जिव्हाळा. उभ्या जन्मांत कधी अधिकउणा शब्द बोललों नाहीं एकमेकींना. तशाच तूं अन् गोदूताई रहा. तुझ्यापेक्षां बरीच मोठी आहे ती. अन् संसार करायला लागून आतां इतकी वर्षं झालेलीं. त्यामुळें तिच्याअंगी बराच मोठेपणा आला आहे खरा. पण म्हणूनच अगदीं थोरल्या बहिणीसारखी वागवील ती तुला; तसेच वामनराव. मोठा व्यासंगी मनुष्य, अन् मनमिळाऊ. त्यांच्या विद्वत्तेमुळें तुझा त्यांच्याबद्दल खचित् चांगला ग्रह होईल, अन् तुला त्यांची मदतही होईल. त्या दोघांच्या सल्ल्यानें रहात जा नीट. कॉलेजांतील सर्व गप्पा त्यांच्याजवळ बोलत जा मोकळेपणानीं, म्हणजे तुला एकटंही वाटणार नाहीं. घराबाहेर मैत्री नसलेलीच बरी. आजकाल कुणाचाही विश्वास नाहीं बघ,......"

आईचे हे शब्द आठवले कीं मला आतां हसूं येतं. दोनतीन वर्षांपूर्वी कित्येक दिवस हेच शब्द आठवून मला चीड येई. माझ्याभोंवतीं हें घरांत-ल्याच मित्रांचं कुंपण घालून केवढ्या मोठ्या आपत्तीची सोय करून दिली होती तिनें!...पण तिला तरी काय बिचारीला कल्पना? ती म्हणते तेंच खरं. आजकालच्या जगांत कुणावरच विश्वास ठेवून चालत नाहीं. एकाला

एक मनुष्य देवासारखा वाटला तर दुसऱ्याला तो तसाच दिसेल याचा मुळींच भरंवसा नाहीं.

*　　*　　*

बाकी, वामनरावांच्यावर आईची बहाल मर्जी असावी, हे साहजिकच होतं. पहिल्या खेपेला आई माझ्याबरोबर मुंबईला येऊन चार दिवस गोदू ताईकडे राहिली होती. तेवढ्यांतच मला त्यांच्याबद्दल कित्ती आपलेपणा वाटू लागला होता. वाणी इतकी मधुर—नव्यांशी नवमतवादावर व रशियावर बोलायला तयार, तर आईजवळ ज्ञानेश्वरीतले दाखले हजर. आई परत जायच्या दिवशी त्यांना म्हणाली, " मनीच्या अभ्यासाबद्दल वगैरे चौकशी करीत जा, बरं का. तिची सर्व तऱ्हेची काळजी आतां तुम्हांला..." तेव्हां क्षणभर माझ्या मनांत आलं, की म्हणावं, " आई, मी का आतां कुक्कुबाळ आहे का ? " पण पुनः वाटलं, " खरंच वामनरावांच्या विद्वत्तेच्या मानानें मीं कुक्कुबाळच आहें. त्यांनीं अभ्यासाची चौकशी केली तर तें काय वावगं होणार आहे ? "

वामनराव जितके बोलके तितकीच आमची गोदूताई अबोल. मनानी जशी माऊलीच. तीन वर्षांत मला इतकं का इतकं, कांहीं कमी पडूं दिलं नाहीं तिनं. मी केव्हांही कॉलेजांतून आलें की खायला प्यायला तिनें स्वतः उठावं. माझ्या आवडीनिवडी, माझं रविवारचं नहाणं, सगळ्या–सगळ्याकडे लक्ष पुरवावं तिनें. शेवटीं शेवटीं माझ्याबद्दल मनांत इतकं किल्मिष असतांना—तसं उत्पन्न व्हायला मी खरोखरच जागा दिली असतांनाही—तिनें आपल्या वागण्यांत रतिभरही फरक दिसूं दिला नाहीं. एकदां मला लहान बहिणी सारखं मानलं तें आजपर्यंत तसंच कायम आहे. पण मला तेव्हां तें बावन-कशी अंतःकरण पारखायची कुठें अक्कल होती ? लहानपणापेक्षांही १७–१८ वर्षांच्या वयांत दिखाऊपणानें जास्त दृष्टी दिपते. जें चकचकतं, जें खण-खणतं, तेंच आकर्षक वाटतं......

*　　*　　*

आई परत घरी गेली त्या दिवशींची संध्याकाळ मला नेहमी आठवते. माझा दिवस कॉलेजच्या गडबडीत केव्हांच निघून गेला. पण चार वाजतां मी घरीं आलें अन् भोवनाली नुसती गोदूताई व तिची मुलंच दिसूं लागलीं, तेव्हां कसंसंच झालं मला एकदम एकटं वाटायला लागलं खोलींत गेलें व कांहींतरी पुस्तक काढून बिछान्यावर लोळत पडलें. पण मनांतली हुरहुर एकसारखी वाढत होती. बाहेर दिवे लागले तरी मी तशीच अंधारांत पडले होतें. तितक्यांत गोदूताईचा आवाज आला, ‘ कमळे जा ग, मनुताई कुठं आहे पहा. दिसली नाही बऱ्याच वेळात. ’ मी तें ऐकलं अन् कमळीचा फेरा येणार हें जाणून उठून वसलें, व डोळ्यांत जमलेले अश्रू पुसून टाकले. इतक्यांत पुनः गोदूताईचा आवाज आला...‘ थांब हो. मीच पाहून येतें. कुठें एकटीच बसली आहे पोर ! ’ व त्याच्या मागोमागच ती स्वतः माझ्या खोलींत आली व म्हणाली, “ मनुताई, अशी तिन्हीसांजेच्या वेळी अंधारात कां ग बसलीस? ये ना बाहेर. ही बघ गॅलरींत मुलं खेळताहेत. आमच्याकडे रस्ता म्हणजे चांगली करमणूक आहे एक. ”

तिनें माझ्या डोळ्यांकडे पाहिलं न पाहिलंसंच केलं. माझ्या उदास चेहेऱ्याची मला जाणीवही दिली नाहीं. चटदिशीं मनोविनोदनाचा एक मार्ग सुचवून ती मला बाहेर घेऊन गेली.—पण तिचा आवाज किती प्रेमळ होता.

मी गॅलरींत गेलें. मुलं एकीकडे खेळत होती. मी कठड्यावर कोंपर टेकून विषण्णपणें पहात उभी राहिलें. गोदूताई आपल्या कामाला गेली.

तिसऱ्या मजल्यावरच्या त्या गॅलरीतून रस्त्यावरले गाड्याघोडे, मोटारी, माणसें केवढीशी दिसत होतीं. एका वारुळांतून दुसऱ्या वारुळात आपलं बिऱ्हाड नेणाऱ्या मुंग्यांसारखी त्याची अखंड धांवपळ सुरू होती. त्यांचें चेहेरेही मुंग्यांसारखेच भावशून्य वाटले मला. मधेच जोडट्रॅम्स गोमांशाप्रमाणें वळवळत जायच्या. केवढा तो विजेचा झगझगाट अन् गाड्यांचा धडधडाट ! माझ्या मनासमोर नकळत आमच्या घरचं मागलं अंगण उभं राहिलं. तो शांत चौक, सडा घालून स्वच्छ, नितळ केलेली जमीन, समोर

बोलून ठेवीत. अलीकडले प्रोफेसर ना ! एकालाही काव्य कळत नाहीं. नुसते पुस्तकांचे गठ्ठे वाचून का काव्य समजतं ? जातिवंत रसिकता कुणाच्या अंगीं असेल तर शपथ !...तशींच आजकालचीं कॉलेजांतील मुलं. कुणालाही व्यासंग नको—मजा करायला येतात नुसती कॉलेजांत ! हळूहळू माझ्या संस्कारक्षम मनांतून तसेच प्रतिध्वनि निघूं लागत. व मला वाटे, वामनराव कित्ती बुद्धिमान्, कित्ती रसिक......

हें सर्व त्यांच्याकडून नकळत झालें असेल किंवा काय कोण जाणे ! पण माझ्यावर पूर्णपणें छाप पाडायला मार्ग अगदीं अचूक सांपडला होता त्यांना. माझी बुद्धीच त्यांनी प्रथम वश करून घेतली. कोणत्याही प्रश्नावर ते जो निकाल देतील तो प्रमाण मानण्याची मला संवय पडून गेली. नवविचारांकडे, नव्या व्यक्तींकडे मला त्यांच्या दृष्टीनें पाहण्याशिवाय गत्यंतर उरलं नाहीं.

पण एवढ्यावरही ते थांबले नाहींत. अत्यंत कौशल्यानें, अत्यंत हळूहळू, त्यांच्या—माझ्यांत एक अनिर्वाच्य, खोल सख्याचा भाव उत्पन्न झाला. सुट्टीच्या दिवशीं पुष्कळ वेळां आम्ही पत्ते खेळायला बसूं. ब्रिझिकचा डाव बसला कीं गोदूताईही खेळायला येई. पण भिडू कोण ? अर्थात् वामनराव व मी, व मग प्रतिस्पर्ध्यांना खिजवायची, घालूनपाडून बोलायची व त्याबरोबरच आपल्या भिडूच्या हुशारीबद्दल, चांगल्या डावाबद्दल हवीतशी स्तुती करायची त्यांना पूर्ण मुभाच मिळे. पहिल्यापहिल्यांदां मला वाटे, त्यांचं गोदूताईला बोलणं केवळ खेळाच्या भरांतलं असावं; पुढें पुढें तितकाही विचार करण्याचं भान मला राहत नसे. तिची टवाळी, माझी स्तुती माझ्या पूर्णपणें अंगवळणी पडली. वामनरावांच्या आदरावर, आपुलकीवर मला माझा हक्कच वाटूं लागला.

* * *

अशा मानसिक अवस्थेंतच माझी पहिली उन्हाळ्याची सुट्टी आली. माझा घरीं जायचा दिवस जवळ येऊं लागला तसतशी माझ्या मनाची कोण ओढाताण होऊं लागली ! घर पुनः दृष्टीस पडेल, आई भेटेल, सर्व

मंडळी भेटतील म्हणून क्षणाक्षणाला उत्सुकता वाटत होती. तर दुसरीकडे वामनरावांच्या संगतीला कांहीं दिवस तरी मुकणं जिवावर येत होतं. त्यांना सुद्धां माझ्या जाण्याचा विचार किती कठीण वाटत होता! शेवटच्या तीन चार दिवसांत दररोज एकदां त्यांनीं म्हणावं, "मग काय, जाणार तुम्ही मनुताई, आतां!"

जायच्या वेळीं मी गोदुताईला नमस्कार केला. तिच्या स्वाभाविक प्रेमळ-पणामुळें तिलाही माझा लळा लागला होता. मी खालीं वांकलें तेव्हां तिनें माझ्या पाठीवरून हात फिरवला व दाटल्या आवाजानें ती म्हणाली, "लवकर परत ये बरं बाई..."

पण मला तें कांहींच जाणवलं नाहीं. वामनराव आपल्याबरोबर स्टेशन-वर येणार आहेत, याच विचारांत मी गर्क होतें. आम्हीं स्टेशनवर पोंचलों. गार्डींत माझं सामान ठेवलं व मी खिडकींत उभी राहिलें. वामनराव त्याच खिडकीवर कोपर ठेवून उभे होते. त्यांची दृष्टि समोर जणूं इंजिनाकडे लागली होती. त्यांना इतकं उदास मी कधींच पाहिलं नव्हतं. पहिली घंटा होऊन गेली. ते जणूं मन घट्ट करून म्हणाले—"खरंच लवकर या मनुताई. तुमच्याशिवाय आमचं घर फार उदास वाटेल..."

* * *

त्या सुटींत मी मुंबईच्या सर्व घडामोडींवर कित्तीतरी विचार केला. वामनरावांची मतं, वामनरावांनीं अनेक वेळां केलेलीं अनेक विधानें, कित्येक वेळां आठवली. त्यांच्या बोलण्यांत ज्या पुस्तकांचा उल्लेख आला होता, त्यांतलीं कितीतरी वाचून काढलीं. अगदीं मोकळेपणानें त्यांच्या आठवणींत मला आनंद होत असे. कारण खरोखर तोंपर्यंत मीं अगदीं निष्पाप भावनेनें त्यांच्याविषयीं विचार करीत होतें. त्यांना माझ्या विकासमार्गावरील एक पवित्र प्रदीप समजत होतें. आईजवळ सुद्धां मी त्यांच्याविषयीं किती बोलत असें.

सुट्टी संपायच्या आधींच चार दिवस मी मुंबईला परत आलें. तेव्हां मात्र

कां कोण जाणे, मला एकंदर सगळंच वेगळं वाटलं. पहिले कांहीं दिवस गोदूताईच्या घरांत कुठेंच मला मोकळं वाटेना. कुणाशींही बोलतांना संकोचल्यासारखं होई. मला वाटे, २॥–३ महिन्यांनीं परत आलें, म्हणून वाटत असेल. आणि नेहमींच नाहीं का असा अनुभव येत? कितीही जिव्हाळ्याची मैत्रिण असूं दे, खूप दिवसांनंतर ती भेटली कीं मला थोडं तरी संकोचल्यासारखं होतं. सगळ्या जगांत एक तूंच अपवाद आहेस, दिनू! मधें कितीदांतरी आपल्याला विरहाचे दिवस आले. पण चार दिवसांनीं भेट होवो नाहींतर ४ महिन्यांनीं होवो. हाताला हात पोंचतांच लहान मुलं कशीं उत्साहानें व मोकळेपणानें खेळूं बागडूं लागतात! त्याचप्रमाणें आपले विचार, आपल्या भावना खेळीमेळीनें धावूं लागतात. पण इतर कुणाच्याही बाबतींत असं होत नाहीं. एवढी शक्तिमान् आगगाडी, पण ती देखील नाहीं का सुरवातीला अडखळत, जणुं मार्ग चांचपत हळूं हळूं वेग घेत तसंच झालं माझं त्या दोन्ही सुट्यांनंतर. विशेषतः, वामनरावांशीं वागण्यांत मला अतिशय संकोच वाटूं लागला.

बाकी त्याला त्यांनींही तसंच कारण दिलं होतं. आतां मला वाटतं, मी दूर असतांना त्यांनीं, त्यांची–माझी गाडी कुणीकडे चालली होती, याचा पूर्ण विचार केला असावा. आपल्या वृत्तींची त्यांना ओळख पटली असावी. त्यांच्यासारख्या मध्यमवयी गृहस्थाला माझ्यासारख्या सरळ, बेछूट, तरुण मुलीबद्दल वाटणाऱ्या आकर्षणाच्या स्वरूपाचीही त्यांना कल्पना आली असावी. मी जवळ होतें तोंवर ते जणुं अंधपणें, बेहोषपणें भराभर सलगीच्या पायऱ्या चढत होते. पण मी दूर गेल्यावर, किती मार्ग आक्रमला गेला याची त्यांना एकदम जाणीव झाली. त्यांना धक्काच बसला असावा. कारण मी परत आल्यावर ते कितीदां तरी कावरेबावरे दिसत. कितीदां तरी उदास दिसत. मधेंच त्यांना माझ्यापासून दूरदूर रहायची लहर येई; पण लवकरच पुनः दुप्पट निकरानें, तीव्रतेनें ते माझ्याशीं बोलूं लागत.

आणि मी?–अजूनही माझ्या डोक्यांत पूर्ण प्रकाश पडला नव्हता. त्यांच्या

वृत्तीमुळें माझ्या वागण्यांत संकोच आला होता. माझ्या विचारांत गोंधळ झाला होता. पण माझ्या अननुभवी मनाला अजून पूर्णपणें कांहींच उमगलें नव्हतें. याचा परिणाम जास्तच वाईट झाला. माझ्या नकळत माझ्या भावनांचीं मुळं खोल जाऊं लागलीं. माझ्या वागण्यांत एक प्रकारचा चोरटेपणा येऊं लागला. वामनराव बसले असतील तिथून विनाकारणच मी फेऱ्या घालाव्या—कांहींतरी कारण आहे असें स्वतःलाच भासवायचा प्रयत्न करावा. पण चार फेऱ्या घालूनदेखील त्यांच्याशी आपणहून बोलायचं मात्र मला धैर्य होऊं नये. या वर्तनाची मला मुळींच जाणीव नव्हती असं नाहीं. पण त्या सर्व प्रकाराची माझ्या बुद्धीवर जणुं एक प्रकारची नशाच चढली होती! बुद्धीची टोंचणी खोल कुठेंतरी जाणवूं लागली तरी तिच्याकडे मी दुर्लक्षच करावें. आपल्या भावनांचं विश्लेषण करायला माझं मन कधींच तयार होत नसे. त्या गोड आतुरतेंत, हुरहुरींत, रंगतच रहावंसं वाटे. एवढंच काय, माझ्या वागणुकींत जो नकळत चोरटेपणा आला होता, त्यामुळें एकसारखी धागधुग वाटे. पण ती धागधुगही मला अत्यंत प्रिय वाटे. तीमुळेंच माझं जीवन जणुं रंजित झालं होतं. माझा सारा जीव वामनराव पुढें काय बोलतात, काय करतात, आपल्या वृत्तींना व त्याबरोबर माझ्याही वृत्तींना कुठली दिशा दाखवतात, याकडेच डोळे लावून बसला होता.

दिनू, तुझ्या-माझ्या प्रीति-विकासांतही अशासारखी एक अवस्था आली होती. त्यावेळीं तुझ्या नकळत मी माझ्या जीवनाच्या भविष्याचे सर्व धागेदोरे तुझ्या हातीं देऊन टाकले होते. व तूं पुढें काय करतोस, मला कुठें नेतोस याकडे डोळे लावून बसलें होतें. पण अंधार व प्रकाश यामध्यें जेवढा फरक तितकाच या दोन अवस्थामध्यें होता, वामनरावांबरोबर मी कुठेंतरी पोंचलें होतें. पण ती कुठें, पुढें काय याचा विचारही करणं मनाला असह्य होत होतं. आहे असाच अंधार रहावा, एवढंच काय, आपले डोळेही मिटून घ्यावे, उगीच कुठें कांहीं अभद्र दिसेल, अशी माझी वृत्ति झाली होती. तीच तुझ्यावर विश्वासलें होतें, तेव्हां? सर्व तऱ्हेच्या निराशामय विश्वांत तुझ्याकडूनच तेवढा प्रकाश येत होता. ती ज्योति जिकडे जाईल त्या मार्गानें

विश्रब्धपणं पाऊल टाकणं, अगदीं भक्तिभावानें जाणं, एवढंच माझं कर्तव्य उरलं होतं. बुद्धि व भावना यांची तिथें पूर्ण तन्मयता होती.

*     *     *

बरेच दिवस वामनराव झोंकेच घेत होते व त्याबरोबर माझा जीव सारखा हेलकावे खात होता. अखेर मला वाटतं, ते दूरदूर रहाण्याचा प्रयत्न करून कंटाळले. त्यांचा संयमाचा, सुविचाराचा सांठा संपत आला असावा—किंवा त्यांनीं बुद्धिपुरःसर सर्वांना झुगारून देण्याचा निश्चय केला असावा. हळूंहळूं त्यांचं माझ्याकडील लक्ष वाढलं. ते माझ्याशीं अत्यंत आपुलकीनें, जवळ-जवळ हक्कानें वागूं लागले. त्याबरोबरच गोदूताईशीं व मुलांशीं त्यांचं वर्तन फारच तिरसटपणाचं होऊं लागलं. माझी इंटरची परीक्षा जवळ येत चालली होती. म्हणून मी कॉलेजमध्यें पुष्कळ वेळां अभ्यासासाठीं थांबत असें. लायब्ररींत मुलींच्या खोलींत, कुठेंतरी शांत जागा पाहून वाचत बसत असें. पांचानंतर परत येतांना वामनरावांनीं मला गांठावं व म्हणावं, ‘ चलायचं कां जरा फिरायला ? आज ऑफिसांत फार काम पडलं बुवा. ’ आम्हीं परस्पर कुठें तरी रम्य जागीं जाऊन बसावं. समोर संध्या—सूर्याचीं हृदयं रंगलीं, मलबार हिलवर फुलांच्या ताटव्याचा सुगंध किंवा समुद्रकांठीं पाण्याचे नाजुक तुषार घेऊन येणारा वारा आमच्याभोंवतीं खेळूं लागला, की माझं मन जास्तजास्तच निःशब्द, भारावल्यासारखं व्हावं; तर वामनरावांना सर्व हृदय मोकळं करायची इच्छा व्हावी. मग ते प्रीतिविवाहावर बोलत; विषम-विवाहावर बोलत; त्यांच्या दृष्टीनें जरठ—तरुणी विवाहांतली विषमता कांहींच नव्हती. अत्यंत सुसंस्कृत, रसिक, सुशिक्षित गृहस्थाला, मराठी चार इयत्ता शिकलेल्या अडाणी बायकोबरोबर सारा जन्म घालवण्याची पाळी यावी, यापरता कोणताही अन्याय जगांत असणं शक्य नाहीं, असं त्यांना वाटे.

त्या दिवसांची आठवण करूं लागलें कीं मला अजूनही जणुं धडकी भरते ! किती अजाण होतें मी ! किती भावनावश होतें. माझे विचार किती कोते, किती दुबळे होते. माझं समर्थन करायला मला मुळींच जागा नाहीं. १७—१८ वर्षांच्या इंटरमधल्या मुलीला यापेक्षां जास्त पोंच असा-

यला पाहिजे याची मला जाणीव आहे; परंतु झालं खरं तसं. एवढ्या प्रचंड दरीकडे मी चाललें होतें. पण तरीही माझे डोळे घट्ट मिटलेले. सकाळीं उठल्याबरोबर, दुपारीं अभ्यास करतांना, लेक्चरं ऐकतांना, माझ्या मनाची पार्श्वभूमि जर कशानें फुललेली असेल, रंगलेली असेल तर ती एकाच विचारानें—'संध्याकाळीं आम्हीं फिरायला जाऊं. कुठें जाऊं? कसे बसूं?'

आणि या सर्वस्वीं रक्षणहीन किल्ल्याला जमीनदोस्त करायला त्या अनुभविक, विवाहित गृहस्थानें आपली सर्व सामुग्री गोळा केली होती. वाणी, मुद्रा, हावभाव सर्व त्यांच्या हुकुमांत होते. समुद्रकांठी बसायला गेलं कीं त्यांनीं पट्‌दिशीं आपला रुमाल काढून माझ्यासाठीं अंथरावा. परतायच्या वेळीं उठूं लागलें, कीं मला आपल्या हाताचा आधार द्यावा—क्षणभर हातांत हात धरून ठेवावा. कधीं कधीं ते माझ्याकडे अशा नजरेनें बघत—माझा जीव धडधडूं लागे, पण शरीर रोमांचित् होई.

या सर्वांतून मी कशी सुटलें? ओढवणाऱ्या आपत्तींतून मी कशी वांचलें? कोण जाणे! परस्परविरोधी बाजू इतक्या विषम बलाच्या होत्या कीं, मी स्वतःच्या सामर्थ्यावर बाहेर पडलें, असं मला म्हणवतच नाहीं. माझं जीवनपुष्प तुझ्यासाठीं प्रफुल्ल रहावं, अनाघ्रात रहावं, असं जणुं विधिलिखितच होतं. त्याशिवाय इतकं कुठलं बळ यायला?

* * * *

एक दिवस सकाळीं गडबडींत मी दुपारच्या अभ्यासाला अवश्य अशी एक नोट्‌स्‌ची वही बरोबर घ्यायला विसरलें. त्यामुळें माझा दुपारीं कॉलेजांत अभ्यास होणं अर्थातच अशक्य झालं. म्हणून मी अचानकपणें अडीच वाजतांच परत आलें. मार्च महिन्यांतल्या त्या उन्हानें जीव दमून गेला होता. म्हणून हळूंहळूं जिन्याची एकेक पायरी चढत वर गेलें व दाराशीं जाऊन विसांव्यासाठीं क्षणभर उभी राहिलें. सहजच माझें लक्ष समोरासमोरच्या तीन दारांमधून गॅलरीपाशीं बसलेल्या गोदूताईकडे गेलं. तिच्यासमोर पाटावर निवडायचे तांदूळ होते. तिच्या मांडीवर तिचा २॥–३

वर्षांचा वसंत निजला होता. गाढ झोपेंतल्या त्या आपल्या बाळाच्या केंसावरून ती अत्यंत हळुवारपणें हात फिरवीत होती, व एकीकडे तिच्या डोळ्यांतून अश्रूंच्या सरीवर सरी येत होत्या. मी विमूढ होऊन उभी राहिलें. गोदूताईनें एकदम वसंतला पोटाशीं धरलें व ती नकळत बोलून गेली, " कसं रे होणार बाळ!–तुझी आई इतकी अडाणी कां ! "

मी तें दृश्य पहात किती वेळ उभी होतें, मग गोदूताईला नकळत माझ्या खोलींत कशी गेलें व बिछान्यावर केव्हां पडलें, तें मला कांहींच आठवत नाहीं. एवढं मात्र खरं कीं, ज्या विचारांना मी मनांत खोल दडवून ठेवायचा नकळत प्रयत्न करीत होतें, स्वतःला देखील त्यांची जाणीव न होऊं देण्याची खबरदारी घेत होतें, ते विचार त्या दृश्यानें खाड्दिशीं मोकळे झाले. व त्यांच्या अचानक हल्ल्यानें मी भांबावून गेलें. वामनरावांच्या व माझ्या मैत्रींत गोदूताईला वाईट वाटण्याजोगं कांहीं नाहीं, अशी गोड समजूत पुनः एकदां करून घेण्याचा मी खूप प्रयत्न करीत होतें. पण मनाच्या चोरकप्यांतून तें सत्य एकदां बाहेर पडल्यावर मग त्याला पुनः त्यांत कोण ढकलूं शकणार ? त्या झगड्यांत मी किती तरी वेळ पडलें होतें. विचारांच्या भरांत मला स्वतःचा विसरच पडला होता. भानावर आलें तीही एका अत्यंत चमत्कारिक दृश्यानें. माझ्यासमोरच्या भिंतीवर एक कांतीण गरगर फिरत होती. किती सपाट्यानें ती आपल्या जवळजवळ अदृश्य धाग्याचे फेर धरत होती ! तिच्या जाळ्याच्या मध्यभागीं एक लहानशी मुंगी सांपडली होती.........

मला गुदमरल्यासारखं झालं. माझ्याभोंवतीं कोणीतरी जाळं विणीत होतं का ? कोण ? वामनराव ? छेः—उगीच त्यांना एकट्यांनाच कशाला दोष देऊं ? त्यांची वासना—माझा मूर्खपणा, स्वतःच्या वागण्याचं कठोरपणें परीक्षण करण्याबद्दलची माझी नावड, माझं प्रवाहपतितत्व...हेंच सर्व एका ठिकाणीं जमून मला गुरफटून टाकीत होतें.

मी घरीं आलें तेव्हां पुनः पांच वाजतां कॉलेजकडे जायचा माझा विचार होता. पण त्या दिवशीं तरी पुनः मी तिकडे वळलें नाहीं. विचारांच्या भरांत

पांच केव्हां वाजले तें कळलंही नाहीं म्हणा–पण तेव्हांपासून परीक्षा आटोपून घरीं जाईपर्यंत माझ्या जिवाचे नुसते लचके निघाले म्हण ना ! परीक्षा तरी माझ्यानें कशी संभाळली गेली, याचंसुद्धां मला आतां आश्चर्य वाटतं. एकीकडे माझ्या सर्व भावनांचा ओघ आत्यंतिकपणें वामनरावांकडे वहात होता. व प्रत्येक भावना जणुं आपलंच समर्थन करीत होती. वामनराव व मी किती समहृदयी होतों—एवढ्या थोड्या अवधींत एकमेकांची एकमेकांना किती ओळख पटली होती—माझं प्रेम हाच त्यांचा विसांवा झाला होता ना ? आतां मी माघार घेतली तर त्यांची कोण निराशा होईल ! वगैरे विचार माझ्या मनांत थैमान घालीत. क्षणांत त्यांच्या विषयींच्या अनुकंपेनें हृदय भरून येई, तर क्षणांत त्यांच्याशिवाय आपलं जीवन किती रुक्ष होईल, किती भकास होईल, या विचारानें जीव दडपून जाई. लगेच विचारांची दिशा बदले व हळूंच आंतून, जणूं अंतःकरणांत दडपून गेलेल्या माणुसकीचा आवाज येई–" गोदूताईनें काय केलं ? वामनराव आदर्श व्यक्ति ना ? त्यांचं तिच्याबद्दलचं हेंच कां कर्तव्य ? मुलांवरचं हेंच का त्यांचं प्रेम ? "

कसं सांगूं तुला, दिनू—असह्य अस्वस्थतेंत गेले माझे ते दिवस. त्या अस्वस्थतेप्रमाणेंच माझं वागणंही झालं होतं. एकादा दिवस गोदूताईशीं अत्यंत प्रेमानें वागें मी. आपण तिला काडीइतकं दुखवायचं नाहीं, असा माझा निश्चय होई. पण नुसत्या कल्पनेनें वामनरावांपासून दुरावलेलं माझं मन इतकं विव्हळ होई कीं, दुसऱ्या दिवशीं तिचा तितकाच राग येई. तसंच वामनरावांच्याही बाबतींत होत असावं !—परीक्षेचे दिवस फारच जवळ आले होते, म्हणून बरं झालं. अभ्यासाचीं पुस्तकं घेऊन दिवसभराचा एक उद्योग तरी माझ्यामागें लागलेला होता. त्या निमित्तानें मला सर्वांपासून दूर जाऊन बसावं लागत होतं, म्हणूनच माझ्या हातून कांहीं चमत्कारिकपणा झाला नाहीं.

माझी परीक्षा कशीबशी आटोपली. आणि तो दिवस उगवला ! तो म्हणजे माझा घरीं जाण्याचा व जिच्यामुळें मी पुनः गोदूताईच्या घरीं परत गेलें नाहीं अशी घटना घडण्याचा......

मी माझ्या खोलींत सामानाची आवराआवर करीत होतें. बिछान्यावर सर्व कपडे पसरले होते. जमिनीवर वह्या, पुस्तकं, मोकळे कागद विखुरले होते. सांठलेल्या पत्रांपैकीं कांहीं वाचत मी टेबलापाशीं उभी होतें. खोलीच्या दाराकडे माझी पाठ होती. वाचतांवाचतां कां कोण जाणे, मला वाटलं कीं, दारांत कोणीतरी येऊन उभं आहे. दुसऱ्याच क्षणाला ते वामनराव असावेत अशीही खात्री वाटली, पण मला मान वळवून पहावंसं वाटेना. गेल्या कांहीं दिवसांत त्यांच्या बाबतींत होणाऱ्या माझ्या धरसोडीच्या वर्तनानं माझं मन मला खात होतं म्हणून, का त्यांच्या पराकोटीला चढलेल्या विकारांची आंच स्त्रीहृदयाच्या उपजत धर्मानेंच मला तेथूनच जाणवली म्हणून कीं काय, कोण जाणे! मी जागच्याजागीं खिळल्यासारखी झालें खरी. मला पाठीमागें वळून पहातांही येईना. अशा माझ्या अक्रुद्ध स्थितींतच—वामनराव चट्‌दिशीं पुढें झाले व त्यांनी मला पाठीमागूनच घट्ट मिठी मारली......

दिनू, मला काय वाटलं तें सांगायला कां पाहिजे...! आज मी त्या प्रसंगाचं वाटेल तसं चिकित्सकपणें विश्लेषण करूं शकेन. त्यांनी ज्या आवेशानं मला आवळलं, त्या आवेशाचा जन्म वासनेच्या पोटीं झाला होता;—माझ्या कानावरून त्यांचा कढत श्वास जाळीत गेला, त्या ज्वाळा त्यांना असह्य झालेल्या अधीरतेच्या होत्या—त्यांच्या आलिंगनांत माझ्या मनाबद्दल विचार नव्हता—हें सर्व आतां मी स्पष्टपणें सांगूं शकेन. त्यावेळीं—त्यावेळीं देखील माझ्या अव्याज, कुमारी मनाला निसर्गसिद्ध जाणतेपणामुळें तें तसंच वाटलं—पण किती गोंधळल्या स्वरूपांत! माझ्या उभ्या जन्मांत तितकी कधीं घाबरलें नव्हतें, मी! एक क्षणच तो, पण तेवढ्यांत माझ्या डोळ्यांसमोर लक्ष चांदण्या चमकून गेल्या. धडपड करणं दूरच राहिलं, पण मला क्षणभर वाटलं, मूर्च्छा येऊन मी आयतीच त्यांच्या हातीं सांपडतें......

पण निसटलें खरी. त्यांच्या हातून स्वतःला सोडवून घेऊन मी टेबलाच्या दुसऱ्या कडेला जाऊन उभी राहिलें. वामनरावांना माझ्या दृष्टींत काय दिसलं असेल तें असो—खालीं मान घालून ते खोलींतून निघून गेले......

त्या दिवशींच संध्याकाळच्या गाडीनें मी घरीं जायला निघालें. नित्या-प्रमाणें वामराव पोंचवायलाही आले. पण अवश्य त्या शब्दांपेक्षां दोघांपैकीं कोणीच कांहीं बोललं नाहीं.

त्या सबंध सुट्टींत माझं मन म्हणजे समरांगण बनलं होतं. हजारों बाजूंनीं हजारों सैन्यं एकदम तिथें लढत असायचीं.

शेवटच्या दिवशींच्या घडामोडीनें माझं मन विटून गेलं होतं. असं वाटे, पुनः त्या प्रकाराची आठवणही काढूं नये. पण स्मृतीचं राज्य आपल्या हातीं थोडंच असतं ? मला आमचे रसिकतेचे वादविवाद आठवत, आमचं संध्या-काळचं फिरणं आठवे...व त्यानंतर तो प्रसंग आठवे. माझ्या कानाला जणुं पुनः कढत श्वास जाळीत आहे असं वाटे. माझा श्वास रोधला जाई, व मग विचार येई, ती रमणीयता—व ही बीभत्सता ! यासाठींच का होतं सारं...

कितीतरी दिवस या विसंगतीनेंच माझं चित्त व्याकुळ होत होतं. अमृतानें भरलेला म्हणून पेला ओठांशीं लावावा व त्यांतून भपकन् दारूची दुर्गंधि यावी, असंच झालं होतं माझं...एवढ्या आदराच्या पायावर उभार-लेलं वामनरावांविषयींचं माझं प्रेम...प्रेम म्हणूं का त्याला ? त्या आंधळ्या नैसर्गिक आकर्षणाला मला आतां प्रेम म्हणवत नाहीं. पण तेव्हां वाटे... छेः ! छिन्नविछिन्न झाली माझी प्रेमाची मूर्ति...

ती उद्विग्नता घालवायला मी एक दिवशीं दुपारींच आमच्या घराच्या आंबराईंत जाऊन पडलें. एका विस्तीर्ण झाडाच्या खालीं पाचोळ्यांतच अंग टाकून दिलं. हातांत नांवाला एक पुस्तक होतं. पण पडल्या पडल्या पानांची हालचाल पहाण्यांत, त्या हालचालीमुळें पानांमधून दिसणाऱ्या उजेडाच्या, आकाशाच्या तुकड्यांच्या आकृती बनवण्यांत, मन गुंतवीत होतें. कशी कोण जाणे—एक प्रकारची गाढ शांति हळूहळू माझ्या मनावर पसरूं लागली. उद्भवल्या परिस्थितीचा सूक्ष्मपणें विचार करण्याची मला धमक वाटूं लागली. त्या कटु प्रसंगाच्या आठवणीमुळेंच माझे डोळे उघडल्यासारखे—दृष्टि निवळल्यासारखी वाटूं लागली.

वामनरावांविषयींच्या आदराच्या नाशानें विमुक्त झालेली माझी बुद्धि मला शिकवूं लागली...प्रेमाची मूर्ति भग्न झाली ?—नसती झाली तर काय झालं असतं ? पूजा करीत बसली असतीस—मूर्तीनें वरदहस्त ठेवला असता. तो हात आधींपासून पुढें केलेला होताच. पण पुढें काय ? पुढें काय, याची शेवटल्या दिवशी थोडीशी प्रचीति आली ना ? अगदीं स्पष्टपणें विचार कर. हृदयांतील भावनांचें व त्या तोल घालवणाऱ्या आकर्षणाचें योग्य मीलन व्हायला कोणता मार्ग होता ? एकच;–विवाह ! !

विवाह !–पण तुझी मूर्ति मोकळी आहे कां ? गोदूताई–कमळी–वसंत.

माझ्या स्वतःच्या विवाहाची कल्पना येतांच गोदूताईच्या होऊन गेलेल्या विवाहाचं मी चित्र रेखाटूं लागें. एका बाजूला वामनराव–मधें अंतरपाट, दुसरीकडे गोदूताई ! कोणत्या आशेवर बिचारीनें त्या दिवशी त्यांना माळ घातली असेल ! आजपर्यंत जी काहीं थोडी वर्षे तिनें संसार केला, त्या वर्षा-गणिक त्या दिवशीच्या आशेची कशी वृद्धि झाली असेल......यापुढें कदा-चित् मी वामनरावांपुढें तशीच उभी राहिलें तर—तर पुढें काय होईल, कुणी सांगावं......

छेः छेः—वामनराव असं नाहीं करणार ! माझी भावना उचंबळून येई. त्यांच्या त्या कृत्याबद्दल तिटकारा येऊन देखील माझ्या मनावरील—भावने-वरील—त्यांची पकड अजून कायम होती. मला पोंचवायला आले होते तेव्हांची त्यांची मुद्रा माझ्या डोळ्यांसमोर उभी राही. किती केविलवाणी पश्चात्तापदग्ध दृष्टी होती ती. अधीरतेच्या भरांत कांहींतरी करून गेले अस-तील ते. त्यांची खरी वृत्ति तशीच कशावरून...या आंदोलनाला जास्तच गति द्यायला वामनरावांचं मला एक पत्रही आलं. माझ्या भावनेला ते पश्चात्तापानें पुनीत झालेलं वाटलं......

पण बुद्धि...कधीं कधीं किती छळते ही बुद्धि ! म्हणूनच तिला भावना-प्रधान लोक विध्वंसक म्हणतात मला वाटतं. त्यांना वाटतं ती सौंदर्याचा नाश करते, तत्त्व हुडकण्यासाठीं त्याचा विच्छेद करते; पण खऱ्या सौंदर्याला, खऱ्या भावनेला बुद्धि इतकी प्रेमळ, विश्वासू सखी कोणती आहे ? तिनेंच

मला वांचवलं...तिनेंच मला थोडे दिवस तरी धीर धरून स्वतःचं मन जाणून घेण्याची सल्ला दिली......

पुनः कॉलेज सुरूं व्हायची वेळ आली तेव्हां मी वामनरावांच्या घरीं जायचं नाहीं असं ठरवलं. हळूंच आईजवळ बोर्डिंगांत रहायची गोष्ट काढली• बी. ए. च्या अभ्यासाचं निमित्त पुढे केलं, व मुंबईस बोर्डिंगांत दाखल झाले.

बी. ए. चा अभ्यास—ज्युनियरचं वर्ष! आईला या वर्षातील विद्यार्थ्यांच्या ठरून गेलेल्या कार्यक्रमाची जाणीव नव्हती म्हणूनच मला बोर्डिंगांत रहायला मिळालं. मोकळ्या रानांत बागडणाऱ्या हरिणांना तरी काय जास्त आनंद वाटत असेल! माझ्याभोंवती सर्वांना जग जणूं नव्यानेंच बहरून आलं, असं वाटत असावं...पण मी! एकांतवासासाठीं—विरक्तपणासाठीच—मी बोर्डिंगची वाट धरली होती. वामनरावांकडची ओढ आवरण्यासाठी खूप वाचावं—जगाचा, स्वतःचा, विसर पडेल इतकं साहित्याच्या विश्वांत आपल्याला कोंडून घ्यावं; जुन्या आठवणींचा मागमूसही लागणार नाहीं अशा नवीनच ठिकाणीं हिंडायला जावं, हाच माझा कित्येक दिवस कार्यक्रम बनला होता कर्तव्य म्हणून गोदूताईकडे कधींकाळी जावं. पण तेंही दुपारीं थोडा वेळ. वामनरावांना माझ्या मुग्धतेवरून, टाळाटाळीवरूनच माझ्या मनांत झालेल्या फरकाची कल्पना आली असावी. त्यांनींही तशीच मुग्धता स्वीकारली, हें तरी माझ्यावर काय थोडे उपकार झाले!—एकट्या गोदूताईची भेट घेऊन आलें कीं माझा निश्चय जणुं द्विगुणित होई. स्वीकारलेल्या मार्गाबद्दल मला गाढ समाधान वाटे. किती आनंदानें, किती प्रेमानें ती माझं स्वागत करी! कमळी, वसंत किती लाडिकपणानें माझ्याशीं खेळत. पुढें कित्येक वेळां माझ्या जीवनाचा भकासपणा मला खायला निघे. उभ्या आयुष्यांत पुनः खेळीमेळीचे मोकळेपणाचे दिवस येणार नाहींत असं मला वाटूं लागे. जन्मभर एक प्रकारच्या संन्यस्त निश्चयानेच रहायचं का, असा प्रश्न मला भेडसावूं लागे. अशा वेळीं मी गोदूताईकडे मुद्दाम जाऊन येई. घटकाभर कमळी–वसंतशीं खेळत बसें.

आजकालचं वारं पाहिलं कीं वाटतं नवमताप्रमाणें मी भित्री ठरेन बहुतेक. नवमतवादी मला म्हणतील, कुठली स्वार्थसंन्यासाची भूल पडली हिला ! प्रेमपिपासेचं नैसर्गिक स्वरूप, उघडं स्वरूप हेंच सत्य होय. अन्नवस्त्रांवर जसा प्रत्येक माणसाचा हक्क तसाच ही नैसर्गिक भूकही शांतवून घेण्याचा त्याला हक्क आहे. त्यांत एवढा ध्येयवाद, एवढी मनाची परीक्षा, एवढी भावनांची कसोटी हवी कशाला ? रोमानॉव्हचा रशियन विद्यार्थी आपल्या प्रियेला—त्या एका दिवसांतल्या मैत्रिणीला-म्हणालाच ना, ‘ Well, it all ends the same way, cherry blossom or no cherry blossom...’ मग वामनरावांच्या आलिंगनाला एवढं घाबरायला कशाला हवं होतं ? गोदूताईचा, तिच्या मुलांबाळांचा, विचार करण्याचं माझं थोडंच कर्तव्य होतं ? वामनरावांनीं तो प्रश्न निकालांत काढल्यावर मला त्याच्याशीं काय करायचं होतं !

पण ते शब्द ऐकून रोमानॉव्हच्या रशियन मुलीच्यादेखील अंगावर शहारे आले. मग माझी काय अवस्था ! मला तर वाटतं, कोणत्याही मुलीवर असा प्रसंग आला व त्यावेळीं तिचं स्त्रीहृदय आपल्या विवाहित वल्लभाच्या वासनाप्रवाहांत वुडून गेलेलं नसलं तर तिच्या जिवाचा थरकांप झाल्यावांचून रहाणार नाहीं. व तिच्यांतील माणुसकीला त्या दुसऱ्या परित्यक्त स्त्री-हृदयाची आठवणही होईलच. स्वार्थसंन्यास ! स्वार्थसंन्यास कसला होता त्यांत ? मी जों जों स्वतःला त्या मोहापासून दूर नेऊं लागलें तसतशी मला माझ्या हृदयांतील आकांक्षेची ओळख पटूं लागली. ज्याच्याठायीं माझा जन्मभर विश्वास राहील असं अढळ स्थान मला हवं होतं. ज्याच्या मनोमांगल्यानें माझं जीवन प्रकाशमय होईल, असा प्रदीप मी शोधत होतें. अनंत प्रीतीनें माझ्या जीवाची ओढ शांतवील असा आसरा मला पाहिजे होता. विचार व भावना यांच्या पूर्ण सख्यांतून उद्भवलेल्या डोळस प्रीतीची मला तहान लागली होती. अशीच प्रीति निरागस आनंदाचा ठेवा होऊं शकते. कोण म्हणतं प्रीति आंधळी आहे म्हणून ? त्या दिवसांतल्या व तेव्हांपासून आजवरच्या माझ्या अनुभवानें तर मला शिकवलं कीं प्रीतीइतकं डोळस,

प्रीतीइतकं तीक्ष्ण दृष्टीचं दुसरं कांहींच नसेल. लौकिक, भेदभाव, मानमरातब, प्रीतीला दिसत नसेल, माहीतही नसेल. पण जिच्यावर हृदयाचं पावित्र्य अधिष्ठित झालेलं असतं, जींत हृदय–विकासाचं बीज सांठवलेलं असतं, ती दिव्यता प्रीतिशिवाय कुणालाच दिसूं शकत नाहीं.

त्या दिव्यतेची मला आस लागली होती. वरवर विचार करतांना मला स्वतःलाच माझं जीवन आपल्या घरासमोरच्या त्या वठून गेलेल्या बाभळीप्रमाणें वाटे. पण त्या एकटेपणाच्या तवंगाखालीं केवढी अगाध शांति भरली होती ! त्या शांतींत उत्सुकता होती—अगदीं उत्कट उत्सुकता होती. पण अधीरता नव्हती. तिची जाणीव झाली कीं मला आमच्या गांवच्या एका टेकडीवरील एकट्याच चांफ्याची आठवण होई. सभोंवारच्या अपरंपार शांतींत तें एकटंच झाड डुलत असायचं. त्याचा सर्व जीवनरस फांद्यांच्या टोंकाशीं येऊन फुलांच्या पाकळ्यांच्या वाटे जणुं उडून जाऊं पाही. त्या झाडाभोंवतीं कितीदांतरी वादळ उठे, त्या झंझावाताच्या दंग्यानें त्याच्या नाजुक फांद्या मोडून पडत. पण त्या फुलांचे प्याले मात्र कधीं खालीं वांकले नाहींत. इतके प्याले उंचावून तें झाड आकाशाजवळ काय मागत होतं ?

त्या चांफ्यासारखाच माझा जीव नवीनच प्रीतिध्येयानें बहरून आला होता; जिवाचा प्याला करून कुठून तरी अमृतबिंदु पडायची वाट पहात होता. पण त्या तपश्चर्येतही त्या चांफ्याप्रमाणेंच माझ्याभोंवतालचं सबंध वातावरण एका नवीनच प्रीतिमय सुवासानें दरवळून गेल्यासारखं मला वाटे. प्रेमपूर्तीच्या आधीं देखील निव्वळ माझ्या प्रीतिध्येयामुळें मला जीवनांत केवढी सहृदयता वाटत होती.

चार वर्षं माझी तपश्चर्या चालली. नंतर दिनू, तूं आलास ! तुला आठवतो ना तो दिवस ? कॉलेजचीं सहाहीं वर्षं मी तुझ्या आसपासच होतें. पण असून नसल्यासारखी होतें. आणि तो दिवस ! किती हळूंहळूं आपण दोघंही त्या दिवसाकडे प्रवास करीत होतों ! त्या दिवशीं माझ्या चांफ्याकडे अमृताचा मेघ वळला व तेजजलानें माझं हृदयाचं पात्र भरून गेलं......

जून १९३५

---

# पश्चात्-बुद्धि

ती त्या वर्षी इंटरला बसणार होती. विश्वविद्यालयाच्या परीक्षांचें सत्र सुरू झालें होतें. तिचीहि परीक्षा जवळ आली होती. पुस्तकांचीं पारायणें करतां करतां तिचा जीव विटून गेला होता. व त्यांतच कांही तरी महत्वाचें काम निघालें. म्हणून एक दिवस सकाळींच ती आपल्या वसतिगृहांतून सदाशिव पेठेंतल्या एका आप्ताकडे गेली.

ती परत जायला निघेपर्यंत बराच उशीर झाला. नऊ वाजून गेले होते. ऊन झालें होतें. म्हणून तिच्यासाठीं एक टांगा आणवण्यांत आला. टांगा दाराशीं आल्याची वर्दी मिळतांच ती बाहेर आली. तिनें चपला घातल्या, छत्री घेतली व ती टांग्यापाशीं आली.

तिला टांग्याच्या पुढच्या पायदानापाशीं एक १६–१७ वर्षांचा मुलगा उभा असलेला दिसला. त्याच्या एका हातांत एक स्केल, पेन्सिल, टांक, व एक जाडशी वही होती. दुसऱ्या हातानें त्यानें टांग्याला धरलें व तोही टांग्यांत चढूं लागला. टांगेवाल्यानें त्याची ‘ सवारी ’ कबूल केली होती.

त्याला चढतांना पाहून ती चकित होऊन उभी राहिली, व त्याला व टांगेवाल्याला म्हणाली—“ कां हो तुम्ही कोण ? सबंध टांगा ठरवला ना रे तुझा ? अन् वर स्वारी घेतोस का ? ”

तिला टांग्याजवळ येतांना पाहून आधींच तो मुलगा गोंधळला होता. टांग्यांतल्या दुसऱ्या स्वारीची कल्पना नसतांना त्यानें ' स्वारी ' ठरवली असावी, असें त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट होत होतें. तो घोंटाळत म्हणाला, "मला परीक्षेला जायचं आहे, फर्ग्युसनच्या मांडवांतच—उशीर झाला आहे."

टांगेवालाही म्हणाला " येऊं द्या जी बाई. कालिजांतच जायाचं त्यांना..."

ती डोळ्यानें त्या मुलाची अवस्था पहात होती. पण तोंडानें म्हणाली, " असेल, असेल. या टांग्यांत नाहीं येतां यायचं—दुसरा पहा..."

तेवढ्यांत ती ज्या वाड्यांतून बाहेर पडली होती, तिथले एक वयस्क गृहस्थ दिंडीपाशीं येऊन पोंचले. त्यांनीं तो प्रकार पाहिला. व ते मोठ्या आवाजांत म्हणाले, " वा हो राव, दुसरा टांगा पहा. हाण रे टांगेवाला, हाण. नीट नेऊन घाल बाईला—"

मान खालीं घालून तो मुलगा बाजूला झाला. टांगा चालू झाला. पहिले हिसके खातच ती टांगेवाल्याला म्हणाली, " बराच आहेस कीं रे तूं. एवढं समजत नाहीं तुला ? दुप्पट फायदा करायला पाहतोस होय—"

टांगेवाला, " नाहीं जी बाई–ततंच जायाचं व्हत त्यांना—" वगैरे बडबडूं लागला.

तिनें समोर पाहिलें. तो मुलगा पायींच झपाट्यानें चालूं लागला होता. तरी टांग्याच्या गतीनें तिच्या व त्याच्यामधलें अंतर एक सारखें वाढत होतें. हळूंहळूं लहान होत जाणाऱ्या त्याच्या आकृतीकडे ती पहात राहिली.

सुदैवानें—कीं दुर्दैवानें ?—ती थोडीशी विचारी होती. कांहींशी सहृदयही होती. म्हणून तिच्या डोळ्यांना बऱ्याच गोष्टी दिसत व त्या तिच्या अंतःकरणापर्यंत पोंचत.

तिला दिसलें कीं त्याच्या पायांत कांहीं नव्हतें. त्याच्याजवळ छत्रीही नव्हती. त्याच्या डोक्यावर एक साधी कापडाची टोपी होती व अंगांत

नुसता जाडसा सदरा होता. तो आपली स्केल, पेन्सिल, टांक, वही वगैरे घट्ट मुठींत छातीशीं धरून झपाझप चालला होता.

तिला आठवलें कीं तो मॅट्रिकच्या मांडवाकडे चालला होता. त्याला उशीर होत होता. हें सांगतांना त्याचा चेहरा कसा झाला होता, हेंही तिला आठवलें. ती स्वतः हुजूरपागेंतून मॅट्रिकला बसली, तेव्हां तिची व तिच्या बरोबरच्या सर्व मुलींची किती बरदास्त राखण्यांत येत असे. नऊ वाजल्यापासून दोघीदोघींचा एक, असे टांगे हजर. बरोबर कोणीतरी मास्तरीण. दुपारीं मेट्रन् फराळाचें घेऊन तयार. एक ना दोन. किती सुखसोयी होत्या तिच्यासाठीं

तिचीं विचारचक्रें चांगलींच वेगानें सुरू झाली होतीं. तिला वाटलें, " ह्या मुलाला उशीर झाला, नाहींतर ह्या उन्हानें त्याला त्रास होऊन त्याचा पेपर वाईट गेला तर...! तो नापास झाला तर—फार वाईट वाटेल बिचाऱ्याला. बेरडांपैकीं नव्हती त्याची चर्या. तो गरीबही असावा बहुतेक...एकपरीनें त्याच्या अपयशाबद्दल मीच जबाबदार होईन म्हणायची...बसला असता समोर तर काय माझी अब्रू जाणार होती ?

तिला वाड्याच्या दिंडीपाशीं आलेल्या माणसाची आठवण झाली. कसं-संच वाटलं असतं त्यांना. समजा मी त्या मुलाला म्हटलं असतं, उशीर झाला होय तुम्हाला ? कांहीं हरकत नाहीं बसा; तर त्या घरंदाज मध्यम वयस्काला चांगला धक्काच बसला असता, नाहीं ? मी देखील बिचकलेंच कीं, त्या कोणा एका मुलाबरोबर, एका टांग्यांत, कॉलेजपर्यंत जायचं—छेः ! रस्ता केव्हां संपतो असं झालं असतं मला......

सारा रस्ताभर तिचा विचार चालू होता. तिचं सामाजिक मन तिचें समर्थन करी. तिचें व्यक्तिनिष्ठ मन तिला दूषण देई.

दुपारीं अभ्यास करतांनाही तिला कितीदां त्या प्रकाराची आठवण झाली. समोर पुस्तक उघडें असून कुठेंतरी भटकतांना तिनें आपल्या

मनाला कितीदां तरी पकडलें. तेच विचार—तीच ओढाताण ! तिला कंटाळा आला. रात्रीं अंथरुणावर पडतां पडतां ती म्हणाली, ' व्यर्थ व्यर्थ मी स्वतःला स्वतंत्रपणें विचार करणारी समजतें, बेछूटपणें वागणारी समजतें. इतक्या क्षुल्लक गोष्टींतदेखील मी ' कसं दिसेल ' या विचारानें नीचपणा करूं शकतें...समाजाची विचारसरणी किती खोल अंतर्यामांत भिनली आहे ! माझ्या प्रकृतिधर्मांचंच स्वरूप घेतलं आहे तिनें...'

असमाधानानें तिचा जीव वैतागून गेला होता.

पण बऱ्याच वेळानें झोंपेची गुंगी येऊं लागली असतां, तिला आंतून आवाज आल्यासारखा वाटला..." पण तूं पुनः असंच करणार नाहींस, बाळ ! "

जुल १९३५

# संवगडी

" आई ग ऽऽऽ—अ ! "

आई नुकतीच चुलीजवळचें सारें काम आटोपून मागल्या दारीं हातपाय धूत होती. ती म्हणाली,

" काय रे बाळू ? "

" आई ग ऽ, झालं माझं खेळणं. आतां आपण दोघांनीं मिळून काम करायचं ना—आपलं दुपारचं—? "

" हं.—ही बघ आलेंच, आतांच आटपलं माझं. तूं आज काय करणार आहेस ? "

" मी किनई तूं सकाळीं दिलेल्या टाइम्समधलं चित्रं कापणार आहें—आणि—आणि बरं कां, माझ्या वहींत डिंकानीं चिकटवणार आहें तीं..." बाळू, हात पुशीत असलेल्या आईच्या कमरेला विळखा घालीत म्हणाला.

" छान--शुंदल आहे हं कल्पना—" आईनें बाळूच्या पाठीवर प्रेमानें थोपटलें—व खालीं वांकून त्याच्या डोक्याचा मुका घेतला.

" आई अं, हंः ! माझ्याशीं बोबडं नाहीं हं बोलायचं. मी मोठा झालों म्हणून तूंच नाहीं का म्हणालीस ? "

"अरे हो बरोबर...आतां नाहीं हं. माझा दोस्त आहे पठ्ठया. चला आतां आपण बरोबर काम करू या......"

आई व बाळू मधल्या खोलींत जाऊन बसली. आईनें आपलें शिवण काढलें. बाळूनें वर्तमानपत्रांचे अंक, कातरी, डिंकाची बाटली, एक मोठी थोरली वही वगैरे आपलें साहित्य गोळा केलें.

"हं—आई—आईग—हें बघ विमॉऽऽन! हें का? माझ्या वहींत पहिल्यानीं विमान पाहिजे गब्या...हो ना आई?...हं. कसं कापूं—इथून?... केवढं जंगी आहे ग...अगदीं ए अ रो प्लेन!!"

कुच्—कुच्—कुच्—कातरी चालूं लागली. एक बाजू कापून झाली. बाळूनें टुण्दिशीं उडी मारली व तो कागदाच्या दुसऱ्या बाजूला जाऊन बसला. वर्तमानपत्रानें जवळजवळ सबंध सतरंजी व्यापली होती. तो आणखी मागे सरकला..."ए आई, सरक ना ग थोडी! माझं बघ—भाऽऽरी कठ्ठीण काम चाललं आहे. हा बघ मी पंखा कापतोऽयऽ ऽ...हं हंः—झालं आमचं विमान काय मस्त दिसतं आहे पण...आतां—मी—बाबा—आल्यावर—दाऽखवीन..." बाळू एका हातांत कापलेलें विमान, व दुसऱ्या हातांत उघडी कातरी घेऊन तालावर बोलत नाचूं लागला.

"सुंदर.—राजा, माझं एक काम करतोस?"

"हो हो ऽ."

"तें ऽ मागलं दार लावलं का, पाहून ये..." बाळू धांवत गेला व धांवत दुरूनच ओरडत परत आला—"हो गऽ आई. लावलंग दार...आतां मी काय कापूं ऽ ऽ?" हां—हां. क्या मिल गया—आई, हा बघ सिंह! कसा मोठ्ठा आहे. महाराज—बागेंतल्या सिंहासारखा...कापूं?—आई पण, हें खूपच कठीण आहे, माहीत आहे का तुला?...हे याचे केंस बघ...काय म्हणतात यांना—आयाळ? कां ऽ, आयाळ?